# नवभारत

या अंकात –




वर्ष २७

अंक पाचवा

फेब्रुवारी १९७४

रु. १–२५



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष सत्ताविसावे
अंक पाचवा

# नवभारत

फेब्रुवारी १९७४

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडकर—प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. मे. पुं. रेगे का. संपादक



वार्षिक रु. १२ अंकास रु. १·२५

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता :

१ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, प्राध्यापकांचे निवासस्थान कीर्ति कॉलेज, दादर-मुंबई २८

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, C/o दी प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

डॉ. जयंत विष्णू नारळीकर

# अणू आणि विश्व

## प्रास्ताविक

आज विज्ञानाचा प्रसार इतक्या वेगवेगळ्या दिशांनी झाला आहे की त्या सर्वांचा आढावा घेताना तज्ञांची सुद्धा मति कुंठित होते. नव्या नव्या साधनांनी जगाच्या ज्ञानभांडाराची वेगाने वाढ होत आहे, पण या स्पेशलायझेशनच्या जमान्यात तथाकथित स्पेशालिस्टने एखाद्या संकुचित विषयाचा अतिशय गहन अभ्यास केलेला असतो. त्यामुळे स्वतःच्या विषयाची माहिती सामान्य माणसाला सांगणे त्याला दिवसेदिवस जास्तच अवघड जात आहे. तरीपण मला असे वाटते की सध्या शास्त्रीय संशोधनाचे प्रवाह कोणत्या दिशेने जात आहेत याची माहिती थोडक्या प्रमाणातच का होईना पण सामान्य माणसाकडे पोचवणे शक्य आहे. त्याप्रमाणे शास्त्रज्ञांनी प्रयत्न केल्यास विज्ञानाच्या जगात घडणाऱ्या घटना आणि त्यातून वेळोवेळी निर्माण होणारी खळबळ, यांची सर्वसाधारण माणसाला थोडी कल्पना येईल. आज याच हेतूने मी आपल्यापुढे बोलण्यास उभा आहे आणि ते पण अशाच विषयावर की ज्याच्यात जवळ जवळ गेले एक तप माझे संशोधन चालू आहे.

१९६१ च्या उन्हाळ्यात इटलीमध्ये कोमो सरोवराकाठी व्हरेन्ना नावाच्या एका लहानशा गावी गुरुत्वाकर्षणावर भरलेल्या एनरिको फर्मी समरस्कूल (Enrico Fermi Summer School) मध्ये मी विद्यार्थी म्हणून गेलो होतो. तेथे गुरुत्वाकर्षणावर अनेक तज्ञांची भाषणे झाली. माझ्या दृष्टीने त्यातील बहुतेक भाषणे श्रवणीय असली तरी फारशी स्फूर्तिदायक नव्हती. याला एकमेव अपवाद म्हणजे लंडनच्या प्रोफेसर हरमन बॉण्डी

---

टीप :– मराठी विज्ञान परिषदेच्या आठव्या मराठी विज्ञान संमेलनप्रसंगी १७ नोव्हेंबर १९७३ रोजी डॉ. जयंत विष्णू नारळीकर ह्यांनी केलेले अध्यक्षीय भाषण, डॉ. नारळीकर व मराठी विज्ञान परिषदेचे पदाधिकारी ह्यांच्या सौजन्याने हे नवभारतात प्रसिद्ध करण्यात येत आहे. – का. सं.



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

( Hermann Bondi ) यांचे भाषण. त्यांत आपल्या लंडनमधील एक सहव्यवसायी प्रोफेसर मकरे (Macrea) यांच्या होगार्थ ( Hogarth ) नावाच्या एका विद्यार्थ्याच्या संशोधनाची त्यानी चर्चा केली. हे संशोधन अतिशय अभिनव स्वरूपाचे होते. त्याचे वर्णन मी पुढे करणार आहे. तूर्त फक्त त्याचा सारांश सांगतो. तो असा की विद्युत् चुंबकीय शास्त्रात केलेल्या प्रयोगाचा निकाल फक्त प्रयोगाच्या उपकरणावर, आसपासच्या वस्तुस्थितीवर आणि प्रयोगाच्या सुरवातीवरच अवलंबून नसतो तर त्याशिवाय तो विश्वाच्या रचनेवरसुद्धा अवलंबून असतो. दूर अंतरावर, आपल्या नजरेपलीकडे असलेल्या ताऱ्यांवर, तारका-विश्वांवर (galaxies) आणि अंतराळातील परिस्थितीवर त्या प्रयोगाचे भवितव्य अवलंबून असते हा सिद्धांत ऐकून सामान्य माणसाला असे वाटण्याचा संभव आहे की या मतप्रणालीत आणि ग्रहांच्या आधारावर भविष्य वर्तवणाऱ्या फलज्योतिषांच्या पद्धतीत बरेच साम्य आहे. हा गैरसमज मी सर्वप्रथम दूर करू इच्छितो. होगार्थच्या सिद्धांताचा फलज्योतिषाशी काडी-मात्रही संबंध नाही. होगार्थचा सिद्धांत शास्त्रीय नियमांवर आधारलेला असून त्याला गणिताचा भरपूर पाठिंबा आहे.

होगार्थचा सिद्धांत विद्युत्चुंबकीय शास्त्रापर्यंत मर्यादित असला तरी व्यापक अर्थाने त्याचा विज्ञानाच्या इतर शाखांवर देखील परिणाम होतो. हे परिणाम विज्ञानाच्या मूलभूत तत्वांशी संबंधित असल्यामुळे ते कोणत्या स्वरूपाचे असतील त्याबद्दल माझ्या मनात जिज्ञासा उत्पन्न झाली आणि माझ्या संशोधनाला एक वेगळीच दिशा लाभली. सुदैवाने माझे केंब्रिजमधले मार्गदर्शक प्रोफेसर फरेड हॉयेल ,( Fred Hoyle ) याना सुद्धा या कल्पना-त्या वास्तव-शास्त्राच्या प्रमुख प्रवाहाच्या उलट असूनही-आकर्षक वाटल्या. दुसऱ्या कोणा कट्टर मतप्रणालीच्या मार्गदर्शकाने आपल्या विद्यार्थ्यास या दिशेने जाण्यास प्रोत्साहन दिले नसते. आज मी आपल्या समोर मांडत असलेले विचार फरेड हॉयेल बरोबर केलेल्या संशोधनावर आधारलेले आहेत, आणि ते नेहमीच्या मतप्रणालीपेक्षा किती वेगळे आहेत हे मी आपणाला दाखवू इच्छितो.

## अणूपासून विश्वाकडे

नेहमीची मतप्रणाली म्हणजे कोणती ? या मतप्रणालीप्रमाणे विज्ञानाचे मूळ नियम आणि प्रयोगशाळेतील वस्तुस्थिती ( यामध्ये प्रयोगाची सामग्री, त्याची सुरवात कशी केली, इत्यादि माहिती अंतर्भूत असते) यांच्यावरच प्रयोगाचा निकाल अवलंबून असतो. आपण एक सोपेच चेंडूफेकीचे उदाहरण



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

घेऊ. हवेत फेकलेला चेंडू किती लांब जाईल आणि किती वेळाने जमिनीवर येईल ? या प्रश्नाचे उत्तर द्यायला एक तर गुरुत्वाकर्षणाचा नियम माहीत असणे जरूर आहे. त्याशिवाय तो चेंडू किती वेगाने कोणत्या दिशेने फेकला आणि त्याच्यावर हवेचा प्रतिकार कितपत होतो ही माहिती पाहिजे. आयझक न्यूटन ( Isaac Newton ) पासून हा दृष्टिकोन शास्त्रज्ञांना लाभला. प्रथम विज्ञानाचा नियम प्रतिपादित करायचा आणि मग गणिताच्या साहाय्याने त्या नियमावर आधारलेल्या प्रयोगाचे भवितव्य ठरवायचे. त्याप्रमाणे निश्चितपणे प्रयोगाचा निकाल लागल्यास 'नियमात अजूनपर्यंत काही चूक आढळली नाही' असा निष्कर्ष काढायचा, आणि तोच नियम आणखी प्रगल्भ प्रयोगासाठी वापरायचा. प्रयोगाचा निकाल अनुकूल असला तर नियम खरा ठरत नाही; परंतु निकाल प्रतिकूल असल्यास तो चूक मात्र ठरतो! अशा तऱ्हेने तावून सुलाखून आजवर चूक न ठरलेल्या नियमांवर साहजिकच शास्त्रज्ञ जास्त विश्वास टाकतात. ज्या नियमांची परीक्षा प्रयोगशाळेतील अणू आणि मूलकण ( elementary particles ) यावर यशस्वी झाली तेच नियम त्याहून अधिक अवघड दिव्यातून पार पडतील असा शास्त्रज्ञांचा विश्वास असतो. अशी दिव्ये खगोलशास्त्रात आढळणाऱ्या आत्यंतिक परिस्थितीत ( extreme conditions ) सापडतात. पृथ्वीवर राहून कल्पना येणार नाही अशा चित्रविचित्र गोष्टी आपल्या विश्वात आहेत. अणूपासून विश्वाकडे ही झेप केवढी मोठी आहे याची मी आपणाला थोडी कल्पना देऊ इच्छितो. 'जे नियम अणूला लागू पडतात तेच विश्वाला देखील लागू पडतील', हे विधान किती धाडसाचे आहे याची पण आपणाला थोडी कल्पना येईल.

## विश्वरूपदर्शन

आपले विश्व किती विशाल आहे? याची कल्पना येण्यासाठी आपण सूर्यमालेपासून सुरवात करू. सूर्याभोवती फिरणाऱ्या अनेक ग्रहांपैकी आपली पृथ्वी एक आहे. पृथ्वीचा परीघ जवळ जवळ ४०,००० किलोमीटर आहे. आपला अगदी जवळचा शेजारी चन्द्र साधारण याच्या दसपट अंतरावर आहे. विज्ञान आणि तंत्रशास्त्राच्या मदतीने मानवाला नुकतीच चन्द्रावर स्वारी करता आली. हे शक्य होईल याची कल्पनासुद्धा गेल्या पिढीत करता आली नव्हती; पण खगोलशास्त्राच्या दृष्टीने चन्द्रावर जाणे म्हणजे घराचा उंबरठा ओलांडून जाण्यासारखे आहे. चन्द्रापेक्षा कितीतरी दूर खगोलशास्त्राने मजल मारली आहे. सूर्य हा सर्वात जवळचा तारासुद्धा आपल्यापासून पंधरा कोटी किलोमीटरवर



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहे. चन्द्राप्रमाणे सूर्यावर स्वारी करणे निश्चितपणे अशक्य आहे; परंतु आपल्या जवळच्या ग्रहांवर–मंगळावर आणि शुक्रावर–पाऊल टाकणे काही असंभाव्य नाही. पण पुढल्या अनेक दशकांपर्यंत तरी मानवाला सूर्यमाला ओलांडून जाणे जमेल असे मला तरी वाटत नाही. सूर्यमालेचा सर्वात दूरचा सदस्य प्लूटो ( Pluto ) हा सूर्यापासून सुमारे सहा अब्ज किलोमीटरवर फिरत असतो.

ग्रहांच्या पलीकडे सूर्यापासून दूर अनेक तारे आहेत. त्यांची अंतरे एवढी मोठी आहेत की किलोमीटर हा एकक सोयिस्कर वाटत नाही. त्या ऐवजी खगोलशास्त्रज्ञ ' प्रकाश वर्ष ' (Light Year) या एककाचा उपयोग करतात. प्रकाशाने एका वर्षात तोडलेले अंतर सुमारे १०,०००,०००,०००,००० किलोमीटर इतके भरते. तुलना करायचीच असल्यास सूर्यापासून पृथ्वीच्या अंतराशी करू. हे अंतर तोडायला प्रकाशाला निव्वळ आठ मिनिटे लागतात. कुठे आठ मिनिटे आणि कुठे एक वर्ष ! परंतु खगोलशास्त्राला प्रकाश-वर्ष सुद्धा अपुरेच पडते. उदाहरणार्थ आपण रात्री पाहतो ती आकाशगंगा म्हणजे अनेक ताऱ्यांचा समूह आहे. ते तारे आपल्या तारका-विश्वाच्या सीमेवर आहेत. आपल्या तारका-विश्वात अंदाजे शंभर अब्ज तारे आहेत. त्यांत सूर्याप्रमाणे अनेक तारे आहेत, त्याहून अनेकपटीने मोठे राक्षसी तारे ( Giants ) आहेत, त्याचप्रमाणे सूर्यापेक्षा फार लहान तारे (White dwarfs, Neutron stars ) पण आहेत. त्याशिवाय पल्सार, सुपरनोव्हा, कृष्णमेघ ( dark–clouds ), तेजोमेघ ( bright nebulae ) यांचा देखील आपल्या तारका-विश्वात समावेश आहे. अशा या तारकाविश्वाचा आकार मध्ये किंचित फुगलेल्या पोळीप्रमाणे आहे आणि त्याचा व्यास सुमारे एक लाख प्रकाश-वर्ष इतका आहे.

विश्वाची मर्यादा आकाशगंगेपर्यंतच आहे, असे अनेक खगोलशास्त्रज्ञांना या शतकाच्या सुरवातीला वाटत होते. परंतु हा अंदाज चुकीचा ठरला. आजचे खगोलशास्त्रातले वेध ( observations ) असे निश्चितपणे सांगत आहेत की विश्व अमर्यादित आहे. आपल्या तारका-विश्वापलीकडे असंख्य तारका-विश्वे आहेत. त्यांच्या समुदायामध्ये आपल्या तारका-विश्वाला विशेष-स्थान आहे असेही नाही. त्याहून विशाल, अधिक प्रकाशवान, अधिक चमत्कारिक तारका-विश्वे अस्तित्वात आहेत. फार काय, तारका-विश्वांपेक्षा अद्भुत अशा अनेक गोष्टींचा साठा आपल्या विश्वात आहे. काही ठिकाणी महाप्रचंड स्फोट होत आहेत, आणि त्यातून रेडिओ लहरी ( radio waves ), क्ष किरणे

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

( X-rays ), गामा किरणे, विश्व किरणे ( cosmic rays ) यांचा आविर्भाव होत आहे. दहा वर्षांपूर्वी खगोलशास्त्रज्ञांना Quasi Stellar Objects किंवा Quasars चा शोध लागला. अतिशय प्रकाशवान आणि अतिशय संकुचित, ताऱ्याप्रमाणे दिसणारे पण खरोखर ताऱ्याहून प्रचंड असे हे 'क्वेसार' म्हणजे काय याचा अजून उलगडा झालेला नाही.

सध्याच्या दुर्बिणी ( telescopes ) दहा अब्ज प्रकाशवर्षांपर्यंत पाहू शकतात. विश्व अमर्यादित असले तरी खगोलशास्त्राला या अंतराची मर्यादा पाळणे भाग आहे. हे अंतर मूलकणांच्या व्यासापेक्षा किती पटीने मोठे आहे ? साधारण $१०^{४०}$ म्हणजे १०,०००,०००,०००,०००,०००,०००,०००,०००, ०००,०००,०००,०००,०००, पटीने ! अणू आणि मूलकणांच्यावर आधारलेले वास्तवशास्त्राचे नियम खगोलशास्त्राच्या या विशाल पार्श्वभूमीवर कितपत सफल झाले आहेत ?

'शंभर टक्के नाही' असेच या प्रश्नाचे उत्तर देता येईल. तात्त्विक खगोलशास्त्रावरील ( Theoretical Astronomy ) संशोधनांचा आढावा घेताना आढळून येते की विज्ञानाच्या मूलभूत नियमांचा उत्तम उपयोग होत आहे पण काही असे यक्षप्रश्न आहेत की ज्यांचे उत्तर अजून सापडत नाही. वेळेच्या अभावी मला या मुद्द्याची सखोल चर्चा करता येणार नाही, म्हणून मी एका उदाहरणाने त्याचे थोडे स्पष्टीकरण करतो. ते उदाहरण आहे सूर्याचे.

## सूर्यतेजाचे रहस्य

मानवाला सूर्य ही आकाशातली सर्वात अद्‌भुत वस्तू वाटणे साहजिकच आहे. सूर्य इतका तेजस्वी कशामुळे झाला ? भरदुपारी उन्हात उभे राहणाऱ्यांना सूर्यापासून उष्णतेच्या रूपात ऊर्जेचे ( energy ), प्रारण ( radiation ) होत असल्याचे मुद्दाम सांगायला नको. अनेक वर्षे शास्त्रज्ञांचा अंदाज होता की ह्या ऊर्जेचा उगम गुरुत्वाकर्षणात आहे. गुरुत्वाकर्षणामुळे सूर्याचे संकुचन होते आणि त्यामुळे ऊर्जेचे प्रारण होते असा गेल्या शतकातील केल्विन (Kelvin) आणि हेल्महोल्टझ ( Helmholtz ) नावाच्या प्रसिद्ध शास्त्रज्ञांचा सिद्धांत होता. त्याप्रमाणे सूर्याचे वय दोन कोटी वर्षे आणि पुढील आयुष्य आणखी पाच कोटी वर्षे इतकेच भरते. त्याउलट आधुनिक भूवास्तवशास्त्र (Geophysics) सांगते की पृथ्वीचेच वय जवळजवळ ४५० कोटी वर्षे आहे. सूर्य तर पृथ्वीपेक्षा वयाने इतका लहान असणे शक्य नाही. मग इतके वर्ष तळपत रहायला सूर्याकडे दुसरा कुठला ऊर्जेचा साठा आहे ?



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

या कोडयाचा उलगडा अणुगर्भीय शास्त्राच्या ( Atomicphysics ) मदतीने झाला. हायड्रोजन बॉम्बचा स्फोट ज्या कारणाने होतो तेच कारण सूर्यप्रकाशाच्या मुळाशी आहे. सूर्याच्या पोटात घडणाऱ्या अणुगर्भीय प्रक्रिया दोन कामे बजावतात. एक काम ऊर्जेची निर्मिती करून सूर्याला तेजस्वी ठेवणे आणि दुसरे विलक्षण दाब निर्माण करून सूर्याचे गुरुत्वाकर्षणामुळे होणारे आकुंचन रोखून धरणे. हा दाब जर नसता तर सूर्याचे आकुंचन इतके झपाट्याने झाले असते की निव्वळ अर्ध्या तासाच्या आत तो बिंदुवत् झाला असता. एडिंग्टन ( Eddington ), काउलिंग ( Cowling ) वगैरे खगोलशास्त्रज्ञांच्या आद्यकार्याची सफल परिणति १९३९ च्या सुमारास हान्स बेथा ( Hans Betha ) यांच्या शोधाने झाली. सूर्यामध्ये कोणत्या प्रक्रिया किती वेगाने होत आहेत, त्याने किती ऊर्जेची निर्मिती होते आणि त्यामुळे सूर्याला किती तेज लाभते वगैरे प्रश्नांची उत्तरे बेथा यानी गणित, वास्तवशास्त्र आणि खगोल-शास्त्र यांच्या आधारे दिली. त्यानंतर ह्या विषयाची प्रगती झपाट्याने होत गेली. इलेक्ट्रॉनिक कम्प्यूटर्सच्या साहाय्याने सूर्य आणि इतर वेगवेगळे तारे यांची सध्याची परिस्थिती, पुढचे आयुष्य, इत्यादी प्रश्नांची उत्तरे देणे शक्य झाले.

परंतु सुमारे तीस वर्षांनी, या प्रगतीत अडथळे निर्माण झाले, आणि सूर्याची आपल्याला पूर्ण माहिती झाली' असे छाती ठोकून सांगणाऱ्या शास्त्रज्ञांची तोंडे उतरली. याचे कारण म्हणजे 'न्यूट्रिनो ॲस्ट्रॉनमी' ( Neutrino Astronomy ) नावाची नुकतीच उदयाला आलेली खगोलशास्त्राची एक नवीन शाखा. न्यूट्रिनो हा विद्युत्भार ( electric charge ) नसलेला आणि स्थिर वस्तुमान ( rest mass ) पण शून्य असलेला, प्रकाशाच्या गतीने धावणारा एक मूलकण. सूर्यात प्रकाशाप्रमाणे न्युट्रिनोची पण निर्मिती होते. परंतु न्युट्रिनोशी संपर्क साधणे अतिशय कठीण ! हे शास्त्रज्ञांना साध्य झाल्यावर अमेरिकेत डेव्हीस ( Davis ) नावाच्या शास्त्रज्ञाने सूर्यातून उगम पावणाऱ्या न्यूट्रिनो पकडून मोजण्याचा घाट घातला. परंतु त्याला पाहिजे तितके न्यूट्रिनो मिळाले नाहीत. फार काय, सूर्यासंबंधीच्या गणिताप्रमाणे जितके न्यूट्रिनो सापडायला पाहिजेत त्याच्या फक्त दशांशानेच न्यूट्रिनो डेव्हीसला मिळाले. ही विसंगती का निर्माण व्हावी ? ज्या वास्तवशास्त्राच्या नियमांवर सूर्याचे गणित आधारलेले आहे, त्याच्यात तर उणीव नाही ?



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## खगोलशास्त्रातले कूटप्रश्न

सूर्यापासून अपेक्षेपेक्षा कमी न्यट्रिनो का यावेत, हे कोडे खगोलशास्त्रज्ञांना अजून सुटले नाही. सध्या खगोलशास्त्रात असे अनेक प्रश्न आहेत की ज्यांची उत्तरे वास्तवशास्त्रातल्या नियमांद्वारे देणे शक्य होत नाही. 'क्वेसार किती अंतरावर आहेत?' 'रेडिओ लहरींचे प्रचंड साठे विश्वात कसे निर्माण झाले?' 'विश्वकिरणात जवळजवळ प्रकाशाच्या वेगाने जाणारे कण कुठून आले? आपल्या सभोवताली असलेले सूक्ष्मतरंगाचे प्रारण (microwave rediation) विश्व–निर्मितीच्या महास्फोटातून उदयाला आले का?' 'विश्वाची निर्मिती केव्हा झाली? 'विश्व अनादि-अनंत आहे का?' इत्यादि प्रश्न सध्या तात्त्विक शास्त्रज्ञांच्या कल्पनाशक्तीला ताण देत आहेत.

या सर्व प्रश्नांचा उलगडा सध्या माहीत असलेल्या मूलभूत नियमातून होईल किंवा नाही याबद्दल शास्त्रज्ञांत मतभेद आहे. प्रस्थापित तत्त्वांचा पुरस्कार करणाऱ्या बहुतेक शास्त्रज्ञांना आशा आहे की नवीन नियमांचा आधार न घेता हे सर्व प्रश्न सुटतील. त्याउलट बंडखोर शास्त्रज्ञांचा दावा आहे की अनाकलनीय प्रश्नांची यादी दिवसें–दिवस मोठी होत चालल्याने, वास्तव-शास्त्राला नव्या दिशेची आवश्यकता आहे. माझा स्वतःचा या नव्या मत-प्रणालीला पाठिंबा आहे. वास्तवशास्त्राला नवी दिशा शोधायचीच असल्यास, मला वाटते मी आधी सांगितलेला मार्ग उपयोगी पडेल. तो म्हणजे विश्वाच्या रचनेची दखल घेणे.

हा मार्ग जास्त विशद करून सांगण्यापूर्वी मी आपल्यापुढे दोन उदाहरणे ठेवतो. त्यांच्याद्वारे मला असे दाखवायचे आहे की विश्वाच्या रचनेचा आपल्या स्थानिक पर्यावरणाशी (local environment) घनिष्ट संबंध आहे.

## रात्र का पडते ?

दिवस आणि रात्र हे आपल्या रोजच्या जीवनातले प्रकार. पृथ्वीच्या परिवलनामुळे सूर्य पश्चिमेच्या क्षितिजापलीकडे गेला की रात्र सुरू होते आणि तो परत पूर्वेच्या क्षितिजातून प्रकट झाला की दिवसाला सुरुवात होते. 'रात्र का पडते?' या प्रश्नाचे वरील उत्तर बरोबर असले तरी ते पूर्ण उत्तर नाही, हे मी आपणाला दाखवू इच्छितो.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मी नुकतेच आपणाला सांगितले की विश्वात सूर्यासारखे किंबहुना त्याहून अधिक प्रकाशवान असंख्य तारे आहेत. त्यांचा प्रकाश पृथ्वीपर्यंत पोहोचायला काय हरकत आहे? आणि हरकत नसल्यास त्याचे प्रमाण किती असेल? समजा आपण आपल्यापासून दहा मीटर वर साठ वॅट चा एक दिवा लावला आणि त्याचा किती प्रकाश आपल्यापर्यंत येतो हे मोजायला एक यंत्र ठेवले. नंतर तोच दिवा वीस मीटरवर ठेवला. त्याचा प्रकाश आता निश्चितच कमी येणार. पूर्वी इतका प्रकाश पाहिजे असल्यास एका ऐवजी चार दिवे वीस मीटरवर ठेवावे लागतील. दिव्यांपासून आपले अंतर जितक्या प्रमाणात वाढवू त्याच्या वर्गाच्या प्रमाणात दिव्यांची संख्या वाढवावी लागेल. याला दीपनाचा व्यस्तवर्ग नियम ( Inverse Square Law of Illumination ) म्हणतात. हाच नियम ताऱ्यांच्या प्रकाशाला लागू होतो. पण गंमत अशी की आपण पृथ्वीपासून जसे जसे लांब जाऊ तसे तसे ताऱ्यांची संख्या पण वर्गाच्या प्रमाणात वाढते. अर्थात हे विधान करताना मी असे गृहीत धरले आहे की विश्वाच्या रचनेला युक्लिड– ( Euclid ) च्या भूमितीचे नियम लागू आहेत आणि ताऱ्यांची संख्या घनता सर्वत्र समान आहे. ( म्हणजे ठराविक घनफलात सर्वत्र तितकेच तारे आहेत. ) यातून काय निष्पत्ति निघते? आपण पृथ्वीपासून खूप दूरचे तारे पाहिले तर प्रत्येक ताऱ्याकडून आपल्याला व्यक्तिशः फार कमी प्रकाश मिळेल, परंतु अशा ताऱ्यांची संख्या इतकी मोठी आहे की त्या सर्वांचा मिळून प्रकाश काही कमी नसेल. उलट जवळच्या ताऱ्यांपासून आपल्याला जितका प्रकाश मिळतो तितकाच लांबच्या ताऱ्यापासून मिळतो. पण विश्व जर अमर्यादित असेल तर त्यातल्या दूरदूरच्या ताऱ्यांचा मिळून प्रकाश अमर्यादितच असणार. तेव्हा अशा अमर्यादित प्रकाशापुढे सूर्याची काय मात्रा चालणार? असे असून दिवस रात्र हा भेद सूर्यावरच काय म्हणून अवलंबून आहे?

हा प्रश्न १८२६ मध्ये वियना येथील ऑल्बर्स ( Olbers ) नावाच्या शास्त्रज्ञाने केला आणि आता याला ऑल्बर्सचा विरोधाभास (Olbers Paradox) म्हणतात. हा विरोधाभास का निर्माण होतो? ऑल्बर्सचे गणित कुठे चुकले? का त्याच्या गृहीतकात चूक होती? हे कोडे उलगडायला एक शतक लागले. १९२८–३२ च्या काळात एडविन हबल ( Edwin Hubble ) नावाच्या खगोलशास्त्रज्ञाने, विश्व प्रसरण पावत आहे असा एक महत्त्वाचा शोध लावला. याचा अर्थ दूरदूरची तारकाविश्वे आपल्यापासून वेगाने दूर जात आहेत. त्या वेगामुळे दूरच्या ताऱ्यापासून येणाऱ्या प्रकाशाचे मंदीकरण होते. हे मंदीकरण दीपनाच्या व्यस्तवर्ग नियमाव्यतिरिक्त होते. त्यामुळे ऑल्बर्सच्या गणिताप्रमाणे



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दूरच्या ताऱ्यापासून फारसा प्रकाश मिळत नाही, आणि सूर्य नसला तर आकाशात जवळ जवळ अंधारच असतो. एका प्रसिद्ध सुभाषिताची दुसरी ओळ थोडी बदलली तर या वस्तुस्थितीचे योग्य वर्णन होते :

एकः सूर्यस्तमो हन्ति न तु तारागणः शतम् ।

– तेव्हा रात्र का पडते या प्रश्नाचा विश्वाच्या प्रसरणाशी घनिष्ठ संबंध आहे.

## पृथ्वीचे परिवलन

ऑल्बर्सच्या विरोधाभासातून असा निष्कर्ष निघतो की आपल्या निकटच्या प्रश्नांचा विचार करताना विश्वाच्या दूरपर्यंतच्या भागांच्याकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. आता याच मुद्यावर मी दुसरे उदाहरण प्रस्तुत करतो.

आपण नेहमी असे विधान करतो की पृथ्वी आपल्या उत्तर-दक्षिण अक्षाभोवती परिवलन करते. या परिवलनाचा वेग किती ? आपणाला माहीतच आहे की कोणत्याही गोष्टीचा वेग मोजण्यासाठी प्रथम एका संदर्भ–व्यूहाची ( reference frame ) आवश्यकता असते. उदाहरणार्थ, जेव्हा आपण एखाद्या आगगाडीच्या वेगासंबंधी विधान करतो तेव्हा तो वेग पृथ्वीला संदर्भ–व्यूह मानून मोजलेला असतो. त्या उलट आगगाडीच्या डब्यात बसलेल्या माणसाला आगगाडी स्थिर असून पृथ्वीवरची झाडे, घरे, इत्यादि झपाटयाने जाताना दिसतात. म्हणून वेग मोजण्यासाठी संदर्भ–व्यूह ठरवणे आवश्यक असते.

पृथ्वीच्या परिवलनासाठी आपण आकाशातल्या दूरदूरच्या ताऱ्यांचा संदर्भ–व्यूह वापरू शकतो. म्हणजे हे तारे स्थिर मानून त्यांच्या पार्श्वभूमीवर पृथ्वीचे परिवलन किती वेगाने होते ते खगोलशास्त्राच्या वेगाने मोजायचे. त्यावरून आपण ठरवतो की पृथ्वीला एक फेरी पूर्ण करायला चोवीस तास लागतात.

पृथ्वीचे परिवलन मोजायची एक पद्धत अशी पण आहे की जी आकाशातल्या ताऱ्यांची बिलकूल दखल घेत नाही. त्याकरता आपण फूको पेंडुलम (Foucault Pendulum ) चा प्रयोग करतो. हा पेंडुलम कुठल्याही उभ्या पातळीत ( vertical plane ) मध्ये दोलन ( oscillation ) करू शकतो. जर आपण त्याचे दोलन एका विशिष्ट पातळीत सुरू केले तर असे दिसून येते की त्याची दोलनाची पातळी हळूहळू फिरत आहे. याचे कारण पृथ्वीचे परिवलन. पण येथे संदर्भ–व्यूह कोणता ? तो ठरवायला आपल्याला न्यूटनच्या गतीच्या ( Motion ) नियमांची दखल घेतली पाहिजे. गतीचे नियम मांडताना



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

न्यूटनला प्रश्न पडला होता की कुठल्याही वस्तूची गति मोजायला संदर्भ–व्यूह कसा ठरवायचा ? हा प्रश्न सोडवण्यासाठी त्याने असे गृहीत धरले की गतीचे नियम एका ठराविक संदर्भव्यूहालाच लागू पडतील आणि त्याला 'केवल अवकाश' ( Absolute Space ) असे नाव न्यूटनने दिले. तेव्हा आपण न्यूटनचे नियम वापरून फूको पेंडुलमच्या मदतीने केवल अवकाशाच्या पार्श्वभूमीवर पृथ्वीचे परिवलन किती वेगाने होते ते मोजू शकतो.

विशेष म्हणजे या दोन भिन्न पार्श्वभूमीवर पृथ्वीच्या परिवलनाचा वेग तोच आहे ! यामागे काय रहस्य असावे?

माखचा सिद्धांत (Mach's Principle)

अनेक शास्त्रज्ञांचे मत आहे की या दोन प्रयोगातून फक्त एवढाच निष्कर्ष निघतो की न्यूटनच्या केवल अवकाशाचा संदर्भव्यूह आणि विश्वातल्या दूरच्या ताऱ्यांचा संदर्भव्यूह हे एकच आहेत. त्यांच्या मते याहून जास्त खोलात शिरून वास्तवशास्त्राला काही लाभ होणार नाही. त्या उलट काही शास्त्रज्ञ या प्रश्नाला खूप महत्व देतात. त्यांच्या मते या प्रश्नाचा सखोल अभ्यास करणे आवश्यक आहे.

या मतप्रणालीचा प्रवर्तक माख ( Mach ) हा गेल्या शतकातील एक शास्त्रज्ञ. त्याच्या मते न्यूटनच्या गतीच्या नियमात काही उणीवा आहेत. उदाहरणार्थ, जर केवल अवकाशात स्थिर असलेल्या वस्तूला गति द्यायची असली तर न्यूटनच्या नियमाप्रमाणे प्रेरकांची ( forces ) आवश्यकता आहे. याचे कारण त्या वस्तूत असलेले जडत्व ( inertia ). न्यूटनच्या मते जडत्व हा वस्तूचा अंगभूत गुणधर्म आहे. त्याउलट माख असे प्रतिपादन करतो की न्यूटनच्या नियमांना आवश्यक असणारे 'केवल अवकाश' हे काल्पनिक ( Abstract ) नसून दूरच्या ताऱ्यांच्या पार्श्वभूमीतून निर्माण झाले आहे. म्हणून त्या ताऱ्यांचा न्यूटनच्या नियमांशी आणि पर्यायाने वस्तूच्या जडत्वाशी घनिष्ठ संबंध आहे. जर ही ताऱ्यांची पार्श्वभूमी अस्तित्वात नसती आणि जर ती वस्तू विश्वातील एकमेव वस्तू असेल तर तिला जडत्व असणार नाही. म्हणून माखच्या मते जडत्व हा वस्तूचा अंगभूत गुणधर्म नव्हे.

माखने हा सिद्धांत गणिताच्या रूपात मांडला नाही तरी त्यातील मूळ कल्पनांनी अनेक शास्त्रज्ञांना–त्यात आइन्स्टाइन–चा पण समावेश आहे–आकर्षित केले आणि त्यांनी आपापल्यापरीने त्या सिद्धांताला वास्तवशास्त्रातील इतर



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नियमांशी जोडायचा प्रयत्न केला. असाच एक प्रयत्न १९६४ मध्ये फरेड हॉयेल आणि मी केला. विश्वात प्रत्येक वस्तूला अंगभूत जडत्व नसून ते जडत्व इतर वस्तूतून मिळते असे आम्ही गणिताच्या सूत्रांनी प्रतिपादित केले. आणि त्या सूत्रातून न मागता आम्हाला गुरुत्वाकर्षणाचा सिद्धांत मिळाला[१]! कधीं कधी शास्त्रज्ञांच्या जीवनात असे स्फूर्तिदायक क्षण येतात. जेव्हा एखाद्या कोडयाचा मर्यादित रूपाने अभ्यास करत असताना सबंध कोडे आपोआप उलगडते; त्याचेच हे एक उदाहरण. या गुरुत्वाकर्षणाच्या सिद्धांतात आणि आइन्स्टाइनच्या गुरुत्वाकर्षणाच्या सिद्धांतात बरेच साम्य आहे–मात्र त्यासाठी विश्वात वस्तूंची संख्या पुष्कळ असायला हवी. जर ती बोटावर मोजण्याइतकीच असेल तर दोन्ही सिद्धांतात बिलकुल साम्य नाही. मी नुकतेच सांगितले त्याप्रमाणे विश्वात वस्तूंची संख्या काही थोडीथोडकी नाही. आपल्याला खगोलशास्त्राने दिसणाऱ्या भागातच सुमारे $१०^{८०}$ ( १ वर ८० शून्ये ) इतका मूलकणांचा साठा आहे.

एका विषयावर दोन सिद्धांत असले की त्यांच्यात किती साम्य आहे यापेक्षा त्यांच्यात किती फरक आहे इकडे शास्त्रज्ञांचे लक्ष असते. गुरुत्वाकर्षणाच्या या दोन सिद्धांतातले फरक शोधायला खगोलशास्त्राचा उपयोग होईल. अतिशय आकुंचित वस्तू ( Highly Condensed Objects ) या दोन सिद्धांताप्रमाणे वेगळे वेगळे आविष्कार दाखवितात. आइन्स्टाइनच्या सिद्धांताप्रमाणे अशा वस्तूंचे आकुंचन सदैव चालू असते आणि शेवटी अशी परिस्थिती येते की विलक्षण गुरुत्वाकर्षणामुळे त्या वस्तूंतून प्रकाश बाहेर पडू शकत नाही. अशा स्थितीला पोचलेल्या वस्तूंना Black Holes असे नाव आहे. सूर्य जर त्या स्थितीला पोचला तर आपल्याला दिसेनासा होईल. परंतु आपली पृथ्वी त्याच्या भोवती फिरत मात्र राहील. त्या उलट आमच्या सिद्धांताप्रमाणे अतिशय आकुंचन पावल्यावर वस्तूच्या गुरुत्वाकर्षणाचे प्रतिकर्षणात ( Repulsion ) रूपांतर होते, आणि त्यामुळे आकुंचन थांबते. असे असल्यास ती वस्तू Black Hole च्या दशेला पोचणार नाही. Black Holes अस्तित्वात आहेत किंवा नाहीत हा खगोलशास्त्रज्ञांपुढे सध्या एक महत्त्वाचा प्रश्न आहे.

## होगार्थचे संशोधन

गुरुत्वाकर्षणाच्या आमच्या या सिद्धांताला प्रेरणा होगार्थच्या संशोधनाने मिळाली. त्या संशोधनाचे मी आता थोडे विस्ताराने वर्णन करू इच्छितो. त्यासाठी आपण दोलनसरणी- ( oscilating circuit ) चे उदाहरण घेऊ. यातून रेडिओलहरींची निर्मिती होते आणि त्या लहरी सरणीतून उर्जा घेऊन

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दूरपर्यंत जातात. त्यामुळे सरणीतील उर्जा कमी होत जाते. हे वर्णन वरकरणी बरोबर वाटले तरी त्यांत एक दोष आहे. हे वर्णन विद्युत्चुंबकीय शास्त्रावर आधारलेले आहे. त्याप्रमाणे दोन तऱ्हेच्या विद्युत्लहरी असतात–एक उर्जा घेऊन बाहेर जाणारी ( outgoing-wave ) आणि दुसरी बाहेरून उर्जा घेऊन आत येणारी ( incoming wave ). मॅक्स्वेल ( Maxwell ) च्या नियमावर हे शास्त्र आधारित आहे आणि त्या नियमाप्रमाणे दोन्ही प्रकारच्या लहरींना या विषयात समान स्थान आहे. तरीसुद्धा प्रत्यक्षात एक प्रकारच्याच लहरी का आढळतात ? वास्तवशास्त्रज्ञांचा असा दावा असतो की जे शास्त्राप्रमाणे शक्य आहे ते विश्वात अस्तित्वात असलेच पाहिजे. मग आत येणाऱ्या लहरी का अस्तित्वात नसाव्यात ?

या दोन तऱ्हेच्या लहरींपैकी बाहेर जाणाऱ्या लहरी भविष्यकाळात संदेश पाठवायला उपयोगी पडतात. जर दोलनसरणी आपण चार वाजता सुरू केली तर त्यातून निघणाऱ्या लहरी सूर्यापर्यंत पोचायला चार वाजून आठ मिनिटांनी सुरुवात होईल. त्या उलट आत येणाऱ्या लहरी भूतकालात प्रवास करतात. त्या लहरी चार वाजता पृथ्वीवरून निघून सूर्यापर्यंत पोचेपर्यंत चारला आठ मिनिटे कमी असतील.

'भूतकालात संदेश पाठवणे अशक्य आहे म्हणून आंत येणाऱ्या लहरी अस्तित्वात नसाव्यात' असे विधान शास्त्रज्ञ करतात. पण त्यात काही तथ्य नाही. कारण या विधानाने मूळ प्रश्नावर बिलकूल प्रकाश पडत नाही. या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर होगार्थच्या संशोधनाने मिळते.

त्या संशोधनाचा आधार म्हणजे १९४५ मध्ये दोन अमेरिकन शास्त्रज्ञ जॉन व्हीलर (John wheeler) आणि रिचर्ड फाइनमन (Richard Feynman ) यांनी केलेले उल्लेखनीय कार्य. त्याचे थोडक्यात विवरण असे आहे. विद्युत्शास्त्राच्या आरंभीच्या काळात कूलंब (Coulomb) नावाच्या शास्त्रज्ञाने दोन विद्युत्भारांच्या ( electric-charges ) मध्ये होणाऱ्या क्रियेचा नियम प्रतिपादित केला होता. या नियमाप्रमाणे दोन विद्युत्भारात आकर्षणाची किंवा प्रतिकर्षणाची क्रिया दुरूनच होते ( Action at a distance )–त्याला माध्यमाची जरूरी नसते. हा नियम सोपा होता पण तो फारसा यशस्वी होऊ शकला नाही. याचे कारण ही क्रिया तात्कालिक किंवा तत्क्षणिक (instantaneous) आहे. म्हणजे एका विद्युत्भाराचा दुसऱ्या विद्युत्भारावर प्रभाव अनंत गतीने होतो. खरी परिस्थिती वेगळीच आहे. प्रत्यक्षात हा प्रभाव प्रका-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शाच्या गतीने जातो. तेव्हा दोन भारामध्ये दुरून होणारी क्रिया प्रकाशाच्या गतीनेच व्हायला पाहिजे. हा महत्वाचा तर्क प्रसिद्ध गणिती गाउस (Gauss) याने १८४५ मध्ये केला होता पण त्याला मूर्त स्वरूप दिले नव्हते. पुढे फॅरडे ( Faraday ), मॅक्स्वेल यानी 'विद्युत्-चुंबकीय क्षेत्र' ( Electromagnetic Field ) या माध्यमाद्वारे विद्युत्भारांच्या सर्व गुणधर्मांचे व्यवस्थित वर्णन केले. यापुढे कूलंबची 'दुरून होणारी क्रिया' मागे पडली.

परंतु गाउसचा तर्क गणिताच्या रूपाने मांडण्याचे काम काही शास्त्रज्ञानी या शतकाच्या सुरुवातीला केले. त्यानुसार दुरून होणारी क्रिया प्रकाशाच्या गतीने जाते. परंतु त्याशिवाय ती समप्रमाणात भूतकालात आणि भविष्यकाळात जाते. म्हणजे नुकत्याच दिलेल्या उदाहरणाप्रमाणे पृथ्वीवरून चार वाजता पाठवलेला संदेश निम्मा चार वाजून आठ मिनिटांनी आणि निम्मा चारला आठ मिनिटे कमी असताना सूर्यावर पोचेल! परंतु प्रत्यक्षात सवंध संदेश चार वाजून आठ मिनिटांनी सूर्यावर पोचायला हवा. हे कसे शक्य आहे? हा प्रश्न व्हीलर आणि फाइनमन यांनी सोडवला. त्यांनी असे दाखविले की जर संदेश भूत आणि भविष्य दोन्हीकडे पाठवता येत असेल तर पृथ्वीवरच्या विद्युत्भाराचा अगदी दूरच्या—कोटयवधी प्रकाशवर्ष दूर असलेल्या—विद्युत्भाराशी संपर्क राहतो. त्यामुळे पृथ्वीवरचा विद्युत्भार हलवला की त्यावर विश्वातल्या सर्व विद्युत्भारांचा एकदम प्रभाव पडतो. या सर्वांचा प्रभाव लक्षात घेतल्यास स्थिर विश्वात (static -Universe) फक्त भविष्यगामी किंवा फक्त भूतगामी लहरीच शिल्लक राहतात. या दोन्हीपैकी एकाची निवड करायला व्हीलर आणि फाइनमन यांनी उष्मतिक शास्त्राचा ( Thermodynamics ) आधार घेतला.

परंतु हा निवड करायचा प्रकार तितकासा ग्राह्य नाही. १९६१ मध्ये होगार्थने जास्त स्वाभाविक मार्गाने हा प्रश्न सोडवला. विश्व स्थिर असण्याऐवजी ते प्रसरण पावत आहे, याची त्याने दखल घेतली आणि असे सिद्ध केले की विश्वाच्या रचनेनुसार ते जर प्रसरण पावत असेल तर त्यांत भूतगामी किंवा भविष्यगामी यापैकी एकाच तऱ्हेच्या लहरी असू शकतील. उदाहरणार्थ महास्फोटापासून ( Big Bang ) निर्माण झालेल्या विश्वात फक्त भूतगामी लहरीच आढळतील; त्याउलट अनादि अनंत अशा नियतगतीने प्रसरण पावणाऱ्या ( steady state ) विश्वात फक्त भविष्यगामी लहरीच असू शकतील.

अशा तऱ्हेने दोलनसरणीत आंत येणाऱ्या लहरी का नसतात या प्रश्नाचे उत्तर मिळते. त्याच बरोबर आपल्याला विश्वाची रचना कशी असावी आणि



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कशी असू नये याबद्दल माहिती मिळते. पृथ्वीवरील प्रयोगशाळेचा विश्वाशी कसा घनिष्ठ संबंध असू शकतो याचे हे प्रभावी उदाहरण आहे.

## विश्वापासून अणूकडे

१९६८-७१ च्या काळात हॉयेल आणि मी होगार्थने सुरू केलेले कार्य पूर्णतेला पोचवले. आज आपणांला माहीतच आहे की वास्तवशास्त्राचा अभ्यास करताना न्यूटनच्या गति-सिद्धांतावर आधारलेले गणित अपुरे पडते. विशेषतः अणू आणि त्याच्या पोटात असलेल्या मूलकणांच्या अभ्यासाकरता पुंजवादावर ( Quantum Theory ) आधारलेले नवे गणित आवश्यक आहे. व्हीलर-फाइनमन आणि होगार्थ यांनी आपल्या कार्यात या नव्या गणिताची दखल घेतली नव्हती म्हणून ते कार्य वास्तवशास्त्राच्या दृष्टीने अपरिपक्व होते. ही महत्त्वाची उणीव आम्ही भरून काढली.

या आमच्या कार्यातून असा निष्कर्ष निघतो की लहानात लहान अशा अणूच्या किंवा त्याच्या पोटातील मूलकणांच्या अभ्यासासाठी सबंध विश्व कसे आहे याची माहिती असणे अवश्य आहे. अतिविशाल आणि अतिसूक्ष्म यांच्यामधला हा पारस्परिक संबंध वास्तवशास्त्रातली एक अत्यंत आकर्षक गोष्ट आहे असे मला वाटते. माझ्या भाषणाचे सार हेच आहे.

मी मांडलेले विचार सर्वांनाच पटण्याजोगे नाहीत. पूर्वीच सांगितल्याप्रमाणे ही मते प्रस्थापित तत्त्वांशी मिळणारी नाहीत. परंतु प्रस्थापित तत्त्वे अनेक प्रश्नांची उत्तरे देण्यास असमर्थ आहेत हे खगोलशास्त्र आज सांगत आहे. या प्रश्नांची यादी जशी जशी लांबत जाईल तशी तशी वास्तवशास्त्राला नव्या विचारसरणीची आवश्यकता वाटत जाईल आणि आज बंडखोर ठरलेली मते आणखी काही वर्षांनी ग्राह्य वाटू लागतील अशी माझी खात्री आहे.

भविष्यकाळ कसाही असो, आज मला संमेलनाचे अध्यक्षपद देऊन आपले विचार मांडायची संधी दिल्याबद्दल मराठी विज्ञान परिषदेचे आणि ते विचार शांतपणे ऐकून घेतल्याबद्दल श्रोत्यांचे आभार मानून मी माझे भाषण संपवितो.

◆ ◆ ◆

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. स. आ. सप्रे

# इतिहासातील ज्ञान आणि आनंद

## ( उत्तरार्ध )

मार्क्सच्या मते कोणत्याही देशातील वा कालखंडातील राजकारण, कायदा, धर्म, वाङ्मय व तत्वज्ञान या गोष्टी प्रामुख्याने तत्कालीन उत्पादनपद्धतीवर व काही अंशी विनिमय पद्धतीवर अवलंबून असतात. मार्क्स या सिद्धांताचा ज्या आग्रहाने व अभिनिवेशाने पुरस्कार करतो तितके त्रिकालाबाधित सत्य त्यात नसले तरी त्यामध्ये पुष्कळच तथ्यांश आहे. या सिद्धांताच्या अनुरोधाने अनेक गृहीतकृत्ये व नवीन विचार मांडता येतात. आर. एच्. टॉनी या पंडिताने "रिलिजन अँण्ड दि राइज ऑफ कॅपिटॅलिझम" या आपल्या विद्वत्ताप्रचुर आणि उद्बोधक ग्रंथात मार्क्सची विचारसरणी खोडून काढण्याचा प्रयत्न केला आहे. टॉनीच्या मते प्रॉटेस्टंट धर्मामुळे भांडवलशाहीची वाढ झाली व तिला जोम आला. धार्मिक स्वातंत्र्यामुळे आर्थिक स्वातंत्र्याच्या कल्पनेला खतपाणी मिळाले. भांडवलशाहीची वाढ प्रॉटेस्टंट देशात झाली हे खरे असले तरी प्रॉटेस्टंट धर्मामुळे ती वाढ झाली हा सिद्धांत फारसा ग्राह्य मानता येत नाही.

मार्क्सच्या सिद्धांतातील प्रमुख वैगुण्य म्हणजे बुद्धीच्या कार्याकडे तो दुर्लक्ष करतो. माकड आणि मानव यातील मूलभूत फरक बुद्धिमत्ता हा आहे. मानवाने शेतीचे महत्व ओळखून आपल्या जीवनात क्रांती केली. माकडाला ते सुचले नाही. ग्रीकांची बौद्धिकपरंपरा चालू राहिली असती तर औद्योगिक क्रांती तेथेच झाली असती. त्याकाळी गुलाम सहज आणि स्वस्तात मिळत होते म्हणून अशी क्रांती झाली नाही हा युक्तिवाद चुकीचा आहे. औद्योगिक क्रांतीच्या प्रारंभी इंग्लंडमध्ये कापडाच्या कारखान्यात लहान लहान मुलांना कामास लावीत. अत्यंत माफक अशा वेतनावर त्यांच्याकडून निर्दयपणे १४ ते १६ तास काम करून घेतले जाई. त्या मानाने गुलाम पाळणे अधिक खर्चाचे होते. गुलाम मेला तर मालकाचे मोठे नुकसान होई. परंतु कारखान्यात काम करणारे मूल मेले तर मालकास त्याची

अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चिंता नसे. परंतु याच निष्ठुर कारखानदारांनी औद्योगिक क्रांतीची मुहूर्तमेढ रोवली. याचे कारण म्हणजे त्यांची बुद्धिमत्ता व दूरदृष्टी, यंत्राकडून काम करून घेणे अधिक सोयीचे व किफायतशीर आहे हे त्यांनी अचूक ओळखले.

अर्थात बुद्धिमत्तेचा उपयोग ही काही गूढ घटना नाही. त्यालाही कारणे आहेत. पण ही कारणे काही अंशी सामाजिक तर काही अंशी जीवशास्त्रीय व वैयक्तिक स्वरूपाची असतात. अत्यंत बुद्धिमान व्यक्ती जन्मतःच निराळ्या असतात. असामान्य बुद्धिमत्तेच्या शास्त्रज्ञामुळे आणि तंत्रज्ञामुळेच उत्पादन-पद्धतीत क्रांतिकारक बदल होत असतात.

काही समाजशास्त्रज्ञ असे प्रतिपादन करतात की सर्वसामान्य माणूस हा समाजशास्त्राचा खराखुरा विषय आहे. समाजाचे व समूहाचे निर्विकारपणे निरीक्षण केल्यानेच या विषयाचे ज्ञान संपादन करता येते. अलौकिक व्यक्तींचा विचार या शास्त्रात अभिप्रेत नाही. याहूनही पुढे जाऊन ते म्हणतात की या शास्त्रामध्ये बाह्य किंवा दृश्य गोष्टींनाच महत्व आहे. भावनात्मक विश्लेषण आभासात्मक असते. त्यातून काहीही फलनिष्पत्ती होत नाही.
कवी म्हणतो :

It was all very well to dissemble your love,
But why did you kick me downstairs ?

– या समाजशास्त्रज्ञांच्या मते लाथाडले हेच केवळ सत्य आहे. प्रेमभावना लपवून ठेवण्याकरिता की तिरस्काराने लाथाडले हा प्रश्न उपस्थित करणे व्यर्थ आहे. त्याचे निश्चित उत्तर देणे अशक्य आहे.

या विचारसरणीबाबत असे म्हणता येईल की नाट्याच्या आवडीमुळे असाधारण व्यक्तीवर अनेकदा इतिहासकारांचे लक्ष केंद्रित होत असले तरी त्यांच्या कार्याकडे दुर्लक्ष करणे चुकीचे आहे. बाह्य किंवा दृश्य गोष्टी अवश्य विचारात घेतल्याच पाहिजेत. परंतु त्यामागील भावनांचा विचार न करणे चुकीचे होय. सुमारे ५० वर्षांपूर्वी " लाईफ अ‍ॅण्ड लेबर ऑफ दि पीपल इन लंडन " हा अत्यंत बहुमोल ग्रंथ प्रसिद्ध करण्यात आला. त्यामध्ये रेखाटलेले सर्वसाधारण जनतेच्या जीवनाचे चित्र अत्यंत उपयुक्त ठरले. त्यातील विवेचनाच्या आधारे गरीब जनतेच्या कल्याणार्थ अनेक उपयुक्त गोष्टी करण्यात आल्या. वर वर पाहता फक्त आकडेवारी व तपशील यांचाच विचार करण्यात आला असे वाटते. परंतु ते खरे नाही. गरीब लोकांना हालअपेष्टा सहन कराव्या लागतात

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ही जाणीव ही एक भावनाच होय. गरिबांचे दैन्य ही एक भावनाच आहे. आकाशातील ताऱ्यांचे निरीक्षण करणाऱ्या खगोलशास्त्रज्ञाला ताऱ्यांना काय वाटते या प्रश्नाचा विचार करावा लागत नाही. परंतु समाजशास्त्राच्या अभ्यासात लोकांना काय वाटते हा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा आहे. सामाजिक सुधारणा करण्याचा उद्देश लोक सुखी व्हावेत हा असतो. सुख हा भावनेचाच भाग आहे.

अगदी शास्त्रीय पद्धतीने विचार केला तरी व्यक्तीच्या कार्याचे महत्व कमी लेखणे योग्य नाही असे दिसून येते. कारण ज्यावेळी अत्यंत महत्वाच्या अशा घडामोडीत परस्पर विरोधी शक्ती जवळ जवळ तुल्यबळ असतात त्यावेळी एका असामान्य व्यक्तीच्या कर्तृत्वाने विजयाचे पारडे फिरू शकते. लेनिन नसता तर रशियन राज्यक्रांतीचे स्वरूप अगदी निराळे झाले असते हे आता सर्वमान्य झाले आहे. त्यावेळी लेनिन जर्मनीमध्ये कैदेत होता आणि त्याची मुक्तता करण्यास सबळ अशी कारणे नव्हतीच. वाटर्लुची लढाई आपण होतो म्हणूनच ब्रिटिश लोक जिंकू शकले हा ड्यूक ऑफ वेलिंग्टनचा दावा बहुधा बरोबर आहे. यावरून असे म्हणण्यास हरकत नाही की मोठमोठ्या घटनांचे भवितव्य काही वेळा एखाद्या व्यक्तीच्या कर्तृत्वावर अवलंबून असते.

इतिहासाचे शास्त्र बनवू पाहणाऱ्या विद्वानांना हे म्हणणे कदाचित आवडणार नाही. इतिहासाचा काही भाग शास्त्राच्या चौकटीत थोड्याबहुत प्रमाणात बसविणे शक्य आहे. परंतु सबंध इतिहासालाच शास्त्रीय स्वरूप देणे आज तरी शक्य नाही. बहुधा अनेक शतकेही हे शक्य होणार नाही. याचे कारण म्हणजे इतिहासाचा विषय विलक्षण गुंतागुंतीचा आहे. आज तरी असे दिसते की ऐतिहासिक घटनांमध्ये योगायोगाला पुष्कळच अवसर आहे आणि असंभाव्य अशा अनेक गोष्टी सतत होत असतात. अशा परिस्थितीत शास्त्रीयतेचा आव आणणे हेच अशास्त्रीय होय.

इतिहासाची आणखी एक महत्वाची शाखा म्हणजे सांस्कृतिक इतिहास. या इतिहासामध्ये धर्मशास्त्र, कला, तत्वज्ञान व शास्त्र या सर्वांचा समावेश होतो. हा सर्वच विषय मोठा मनोज्ञ आहे परंतु त्याचे विवेचन कित्येकदा रटाळ पद्धतीने केले जाते. या विषयाचा विस्तार प्रचंड आहे आणि त्यातून निवड फारच काळजीपूर्वक करावी लागते. अशी निवड करताना काही मूल्ये डोळ्यासमोर ठेवणे आवश्यक आहे. केवळ एखादी व्यक्ती प्रभावशाली होती म्हणून तिला स्तुतिसुमने वाहणे, तिला श्रेष्ठत्व बहाल करणे हे चुकीचे होय. सांस्कृतिक



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

इतिहासाचा एक महत्वाचा उद्देश चांगल्या, वाईट गोष्टींचा निकष ठरविणे हाच आहे.

सांस्कृतिक इतिहासाच्या क्षेत्रामध्ये तत्वज्ञानाचा इतिहास व धर्म आणि तत्वज्ञान यांचे परस्पर संबंध हे विषय फारच हृद्य आहेत. तत्त्वज्ञानाचा प्रारंभ ग्रीसमध्ये धर्माविरुद्ध पुकारण्यात आलेल्या बंडात झालेला आढळतो. उद्योगधंद्याच्या निमित्ताने ग्रीक लोकांना सतत परदेशपर्यटन करावे लागे. त्यावरून त्यांच्या हे लक्षात आले की देशोदेशींच्या चालीरीती, श्रद्धा यामध्ये फारच वैचित्र्य आहे. तेव्हा आपल्या धार्मिक विचारसरणीला अधिक तर्कशुद्ध पाया असणे आवश्यक आहे अशी भावना त्यांच्यामध्ये दृढमूल होऊ लागली. अर्थात त्यांची ही बुद्धिवादी विचारसरणी परिपूर्ण होती असे नव्हे. ऑलेंपिअन देवावरचा त्यांचा विश्वास जरी उडाला तरी नियती अशी काही एक गोष्ट आहे अशी त्यांची श्रद्धा होती. मात्र विश्वाच्या रचनेमध्ये काही कार्यकारणभावाचे सूत्र आहे व ते आपण जाणून घेतले पाहिजे अशी त्यांची भूमिका होती. अशा रीतीने मानवी इतिहासात बुद्धीला प्रथमच प्राधान्य देण्यात आले आणि प्रत्येक गोष्टीची चिकित्सा झाली पाहिजे असा पायंडा पडू लागला. परंतु ही बुद्धिवादाची सुरेख सुरवात अल्पजीवी ठरली. पायथागोरसच्या गूढवादी विचारसरणीमुळे तिची पिछेहाटच झाली आणि या गूढवादाची छाया प्लेटो, रूसो आदि विचारवंतांवरही पडली. इतकेच नव्हे तर आजही या गूढवादाचा पगडा कायम आहे. तर्कनिष्ठ विचारसरणीऐवजी गूढवादी भोंगळ विचारसरणीचा पुरस्कार केला तरच जीवनाचा खरा अर्थ लागतो असा एक विचार आज रूढ होत आहे.

या भोंगळ विचारसरणीवर आज एक रामबाण उपाय उपलब्ध आहे. तो म्हणजे शास्त्रीय ज्ञान. शास्त्राचे महत्त्व वादातीत आहे. आधुनिक तांत्रिक प्रगती शास्त्रीय ज्ञानामुळेच शक्य झाली आहे. युद्धात यशस्वी होण्याकरिता किंवा शांततेच्या काळात आर्थिक अभिवृद्धीकरिता शास्त्रीय ज्ञानाचाच पाठपुरावा करावा लागतो.

कॅथॉलिक चर्चचा उदय आणि विकास हा सांस्कृतिक इतिहासातील एक अत्यंत मनोज्ञ असा विषय आहे. ह्या संघटनेस १३ व्या शतकात परिपूर्णता आली. या संघटनेचे पाचव्या शतकातील स्वरूप पाहिल्यास त्यावर तीन विचारप्रणालींचा प्रभाव पडला असल्याचे आढळून येते. अगदी प्रारंभी कॅथॉलिक चर्चने ज्यू लोकांचे पवित्र ग्रंथ व परंपरा यांचा स्वीकार केला होता. त्याजबरोबर त्यांची काहीशी कडक नीतिमत्ता व इतर धर्माबद्दल असहिष्णू वृत्ती या गोष्टींचाही या संघटनेने अंगिकार केला होता. सेन्ट ऑगस्टाइनच्या (इ. स. ३५४–४३०)

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वैचारिक नेतृत्वामुळे प्लेटोचे तत्त्वज्ञान ख्रिश्चन धर्मामध्ये समाविष्ट करण्यात आले. चर्चची संघटना सुसूत्र व मजबूत करण्याकरिता रोमन लोकांनी राज्य-कारभारात उपयोगात आणलेल्या कार्यपद्धतींचा अवलंब करण्यात आला.

यानंतरच्या शतकामध्ये चर्चकडे भूमध्य समुद्रातील प्रदेशांचा सांस्कृतिक वारसा आला होता तर सरंजामशाहीने उत्तरेतील रानटी संस्कृतीचा स्वीकार केला. काही काळ तर चर्चवर सरंजामशाहीची दाट छाया पडली होती. परंतु पोपचे वाढते वर्चस्व आणि धर्मगुरुवर ब्रह्मचर्यव्रताची सक्ति यामुळे चर्चचे स्वातंत्र्य अबाधित राहिले. धर्मगुरूंना संतान नसल्यामुळे चर्चच्या जमिनींचा वारसा चर्चकडेच राहिला. ११ व्या शतकापासून १३ व्या शतकापर्यंत चर्चचे सामर्थ्य वाढतच गेले. वाढत्या शिस्तीबरोबर पांडित्यासही प्रगल्भता आली. या संदर्भात सेन्ट ऑक्विनासचा ( १२२५–१२७४ ) खास उल्लेख करणे आवश्यक आहे. नाविन्याचा पुरस्कार करणारा तो एक निर्भय विचारवंत होता. कॅथॉलिक तत्व-ज्ञानाच्या क्षेत्रात त्याचा शब्द अखेरचा मानला जातो. त्याने अरब लोकांच्या प्रभावामुळे कॅथॉलिक धर्मतत्वज्ञानात प्लेटोच्या जागी ॲरिस्टाटलची प्रतिष्ठापना केली आणि त्यामुळे आधुनिक तर्कशास्त्राचे कॅथॉलिक धर्मसंप्रदायास वावडे होऊन बसले आहे.

१४ व्या शतकापासून ते १६ व्या शतकापर्यंत रोमन कॅथॉलिक चर्चवर अनेक भीषण आपत्ती येऊन कोसळल्या. या सर्व आपत्तीतून ती संघटना सुखरूप राहिली हे एक मोठे आश्चर्यच होय. प्रथम पोपच्या गादीवर दोन व्यक्तींनी हक्क सांगितल्यामुळे रणकंदन माजले. हा वाद मिटतो न मिटतो तोच युरोपमध्ये बौद्धिक पुनरुज्जीवनाची लाट उसळली. पुढे धर्मगुरूंच्या सुखविलासी राहणीमुळे उत्तरेकडील धर्मशील जनतेमध्ये संतापाची लाट उसळली आणि धार्मिक सुधारणेची चळवळ फोफावली परंतु याही वावटळीतून कॅथॉलिक धर्म काही व्यक्तींच्या कर्तबगारीमुळे अबाधित राहिला.

इतिहासाची आणखी एक महत्वाची शाखा म्हणजे संघटनांचा इतिहास. परंतु ह्या शाखेचा विशेष अभ्यास झालेला नाही. हा विषय मात्र अत्यंत जिव्हाळ्याचा आहे. संघटनानाही व्यक्तीप्रमाणे आयुष्यक्रम आहे : बाल्य, तारुण्य व वृद्धावस्था. संघटनांच्या अभ्यासापासून काही उपयुक्त असे निष्कर्ष काढता येतात. अर्थात हे निष्कर्ष म्हणजे काही त्रिकालबाधित सत्य नव्हे. संघटनांचे विविध प्रकार आहेत : धार्मिक संघटना, राजकीय, शैक्षणिक संस्था, औद्योगिक संस्था, कामगार संघटना वगैरे. तांत्रिक प्रगतीबरोबर संघटनांचे महत्वही वाढते.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आणि आज तर संघटनांचे अधिराज्य सर्वत्र पसरलेले आढळते. व्यक्तीच्या कर्तृत्वाचे क्षेत्र दिवसेंदिवस संकुचित होत आहे तर संघटनांच्या कार्याचे क्षेत्र सतत वाढत आहे. अनेक बाबतींत प्रत्येक व्यक्तीला निरनिराळ्या संघटनांचा आश्रय घ्यावा लागतो. घर विकत घेण्याकरिता कर्जाची जरुरी असल्यास बँकेकडे धाव घेतली पाहिजे. आजारीपणात हॉस्पिटलमध्ये दाखल व्हावे लागते. कामगारांना स्वहित संरक्षणाकरिता कामगारसंघटनेचा आधार घ्यावा लागतो. सर्व संघटनांची उद्दिष्टे दुहेरी स्वरुपाची असतात: सार्वजनिक आणि अंतर्गत स्वरुपाची. उदाहरणार्थ कोणत्याही राजकीय पक्षाचे जाहीर केलेले उद्दिष्ट म्हणजे राष्ट्रहित व लोककल्याण; परंतु अंतर्गत उद्दिष्ट आपल्या पक्षाकरिता सत्ता काबीज करणे हे असते.

संघटनांच्या अभ्यासापासून अनेक गोष्टी शिकता येण्याजोग्या आहेत. या ज्ञानाच्या अभावी अनेक ध्येयवादी व्यक्तींच्या आयुष्यातील कार्याची हानीच झालेली आढळते. सेन्ट फरान्सिसचे उदाहरण ( ११८१–१२२६ ) या दृष्टीने अत्यंत उद्बोधक आहे. त्याचे व्यक्तिमत्त्व अत्यंत गोड होते. जगाच्या इतिहासात इतकी प्रेमळ व्यक्ती झालीच नसावी. त्याचे मानवावर तर निरतिशय प्रेम होतेच परंतु पशुपक्ष्यांवर, सूर्यचंद्रावर, इतकेच काय वाऱ्यावरही तो मनापासून प्रेम करी. सर्वत्र बंधुभावाचे वातावरण निर्माण व्हावे या उदात्त हेतूने त्याने आपल्या पंथाची स्थापना केली. ब्रह्मचर्य, निष्कांचनता व आज्ञाधारकता ही त्या पंथाची सूत्रे होती. परंतु त्याच्या वारसदाराने ही तत्वे झिडकारून टाकली आणि सुखोपभोगात तो रममाण झाला. अशा रीतीने हा पंथ शेवटी लुप्तप्रायच झाला.

अशा प्रकारचा खेदजनक अनुभव सर्वत्र येतो. अत्यंत ध्येयवादी अशा संस्थेमध्ये अनाचार आणि अनागोंदी कारभार थैमान घालत असल्याचे आपण अनेकदा पाहतो. संघटनांच्या कार्यपद्धतींच्या अभ्यासापासून असे धोके कसे टाळता येतील हे आपणास कळू शकते.

काही संस्था आपले कार्य दीर्घकाळ उत्कृष्टपणे करीत असल्याचे आढळते तर काही संस्था अल्पावधीतच अयशस्वी ठरल्याचे आपण पाहतो. इंग्लंडमधील १७ व्या शतकात स्थापन झालेली रॉयल सोसायटी ऑफ सायन्स ही संस्था आजही अप्रतिम कार्य करीत आहे. प्रथम श्रेणीचे सर्व शास्त्रज्ञ आजही तिचे सन्मान्य सभासद आहेत. परंतु याच्या उलट रॉयल ॲकॅडमी ऑफ आर्टस ही संस्था अगदीच निष्प्रभ ठरली आहे. प्रतिभाशाली चित्रकारांना तिच्यामध्ये मानाचे स्थान मिळत नाही. याचे एक कारण म्हणजे शास्त्रीय संशोधनाचे मूल्य-

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मापन व्यक्तिनिरपेक्ष पद्धतीने व थोडेबहुत अचूक करता येते. अशा तऱ्हेने कला आणि वाङमय या क्षेत्रातील कार्याचे मूल्यमापन करणे कठीण आहे. साधुत्व अजमावणे तर याहूनही अधिक अवघड आहे आणि म्हणूनच साधुत्वाच्या नावा-खाली अनेक ढोंगी लोक दीर्घकाळ लोकांची दिशाभूल करू शकतात. यातून एक अत्यंत महत्वाचा निष्कर्ष निघतो की जर नेत्यांच्या साधुत्वावरच एखाद्या संस्थेचे कार्य अवलंबून असेल तर ती संस्था फार काळ उपयुक्त कार्य करू शकणार नाही. हे एक विदारक सत्य आहे. मात्र साधुसंतांना त्याची अनेकदा जाणीव नसते.

एखाद्या संस्थेचे मूल्यमापन करताना तीन गोष्टी विचारात घ्याव्या लागतात : १) ती संस्था जनतेकरिता काय करते. २) आपल्या नोकरवर्गाकरिता व सदस्यांकरिता काय करते. ३) नेत्याकरिता काय करते. अनेकदा संघटनेचे लक्ष शेवटच्याच दोन उद्दिष्टांवर केन्द्रित होते आणि जनहिताचा तिला विसर पडतो. याकरिता संघटनेच्या कार्यावर जनतेचे परिणामकारक नियंत्रण असणे आवश्यक आहे. असे नियंत्रण ठेवणे फक्त लोकशाहीतच शक्य आहे. परंतु लोक-शाहीतही हे नियंत्रण आर्थिक क्षेत्रात अभावानेच जाणवते. या सर्व बाबतीत इतिहासाचा अभ्यास आपल्याला मार्गदर्शक ठरू शकतो.

जागतिक सरकार स्थापन झाले तर त्याला स्थैर्य लाभेल का हा प्रश्न संघटनाशास्त्रात सोडतो. त्यावर इतिहास काही उपयुक्त प्रकाश पाडू शकतो. अशा तऱ्हेचे सरकार पूर्वी कधी प्रस्थापित झाले नव्हते तेव्हा पुढे ते कधी होणे शक्य नाही हा विचार अशास्त्रीय आहे. पूर्वी कधी नव्हते एवढे अवाढव्य साम्राज्य ६ व्या शतकात सायरसने निर्माण केले. उत्कृष्ट रस्त्यामुळे ते टिकवून धरणे शक्य झाले. रोमन साम्राज्य याहूनही अफाट होते परंतु रस्ते अधिक चांगले असल्यामुळे त्याला स्थैर्य लाभले. त्याकाळी रस्त्यांना जे महत्व होते ते आज विमानांना आहे. जागतिक सरकार जर अस्तित्वात आले आणि त्या सरकारला वैमानिक वाहतुकीवर आपली मक्तेदारी प्रस्थापित करता आली तर ते टिकू शकेल. अर्थात जागतिक सरकार प्रस्थापित करणे महाकठीण काम आहे; परंतु ते प्रस्थापित झाल्यास टिकविणे अशक्य होणार नाही.

शिस्त आणि स्वातंत्र्य यांचा सर्वोत्कृष्ट समन्वय कसा करता येईल हा एक अत्यंत महत्त्वाचा प्रश्न आहे. तो जर शक्य तितक्या लवकर आजच्या परि-स्थितीत सोडविला नाही तर अराजक किंवा हुकूमशाही यांचा धोका संभवतो. ग्रीक साम्राज्याच्या प्रस्थापनेपासून आजपर्यंत लहानमोठ्या क्षेत्रात या बाबतीत



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मानवी समाजाची परिस्थिती दोलायमानच झालेली आढळते. कधी शिस्तीला अवास्तव महत्व दिले जाते तर कधी स्वातंत्र्याला. परंतु ही परिस्थिती काही भूषणास्पद नाही. विचारस्वातंत्र्य आहे पण आचार बहुतांशी परंपरेला धरूनच आहेत, अशा परिस्थितीत सर्जनशीलतेला बहर आलेला आढळतो; परंतु संशयवादामुळे नीतिमत्तेला तडे जातात आणि अराजक माजते. परिणामतः स्वातंत्र्य लुप्त होते आणि परत हुकूमशाहीची प्रस्थापना होते व त्यातून एक नवीन परंपरा तयार होते.

स्वातंत्र्य आणि शिस्त या परस्पर विरोधी तत्वांचा समन्वय करण्याकरिता एक प्रकारच्या तडजोडीचीच आवश्यकता आहे. वैयक्तिक कर्तृत्वाला अवसर न देणारी समाजरचना निरुपयोगीच होय. त्याचबरोबर अनिर्बंध वैयक्तिक स्वातंत्र्यामुळे समाजरचनाच विस्कळित होते हेही विसरता येत नाही. काहींच्या मते बुद्धिमत्ता आणि नीतिमत्ता यांच्यामध्ये मूलगामी संघर्ष आहे आणि अज्ञान आणि धर्मभोळ्या कल्पना यांच्या आधारावरच नीतिमत्ता टिकू शकते. स्वतंत्रपणे विचार करणारी व्यक्ती स्वार्थीच असणार असे ते प्रतिपादन करतात परंतु ही विचारसरणी गूढवादी स्वरूपाची असून त्यामध्ये नीतिमत्ता व बुद्धिमत्ता यांच्याबद्दलचे अज्ञानच प्रकट होते. उदाहरणार्थ मुलांनी अपशब्द बोलणे व चोरी करणे ह्या दोन्ही गोष्टी सारख्याच वाईट आहेत. अशा तऱ्हेची शिकवण दिली असल्यास कालांतराने जेव्हा अपशब्द उच्चारण्यामध्ये काही पाप नाही असा विचार प्रसृत होतो. तेव्हा चोरी करणे हेही क्षम्य होय अशी भावना मूळ धरू लागते. अशी शिकवणूकच घातक आहे. बुद्धिमत्ता आणि नीतिमत्ता यामध्ये काही विरोध आहे हा विचारच चुकीचा आहे. बुद्धिमान माणूस स्वार्थीच असणार ही कल्पना चुकीची आहे. निःस्वार्थीपणाची महती चुकीच्या कारणाकरिता लोकांच्या मनावर बिंबवली असेल व तिची व्याप्ती अगदी मर्यादित असेल तर असे होण्याचा संभव आहे. शास्त्रीय ज्ञानाचा याबाबतीत मोठा उपयोग आहे. शास्त्रीय ज्ञानाचा आधार बुद्धिमत्ताच आहे. शास्त्रांच्या अभ्यासामुळे निरपेक्षपणे विचार करण्याची सवय जडते आणि वैय्यक्तिक दृष्टिकोनापेक्षा सामाजिक दृष्टिकोनाला महत्व येते. कदाचित अशा तऱ्हेची मनोभूमिका तयार होण्याकरिता इतिहासाचा अधिक उपयोग होऊ शकेल. अराजकाच्या दिशेने वाटचाल करणारे अनिर्बंध व्यक्तिस्वातंत्र्य किंवा चेतनारहित परंपरागतवाद या दोन्हीही गोष्टी कशा त्याज्य आहेत हे इतिहासावरून अधिक चांगले कळून येते.



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आत्यंतिक स्वरूपाच्या वैय्यक्तिक आणि संशयवादी विचारसरणीमुळे काही समाज विनाश पावले आहेत. याची प्रमुख उदाहरणे म्हणजे ग्रीस आणि बौद्धिक पुनरुज्जीवनानंतरचा इटली. परंतु त्यांचा अस्त होण्यापूर्वी तेथे सर्जनशीलतेला अपूर्व बहर आलेला होता आणि त्याचा सर्व जगाला फार मोठा फायदा झाला आहे. नित्याच्या चाकोरीतच हे देश राहिले असते तर मानवजातीला त्यांचा फारच थोडा उपयोग झाला असता. ज्या तऱ्हेने या देशांना अवकळा आली ती पद्धतही नेहमीची नव्हती. बहुधा राष्ट्रांच्या विनाशास कारणीभूत होणाऱ्या गोष्टी म्हणजे परंपरागतवाद, भूतकालाचे दास्यत्व, नाविन्याची भीती आणि साचेबंद विचार आणि आचार; नाविन्याच्या आवडीपेक्षा नाविन्याच्या भीतीमुळे विनाश पावलेली राष्ट्रे अधिक आहेत. काहीशा तऱ्हेवाईक, अपवादात्मक व्यक्तींना ज्या समाजात स्थान नाही अशा समाजाचा भविष्यकाल उज्ज्वल असत नाही. वाङमय, कला व शास्त्रे यामध्ये ज्या पुरुषांनी महनीय कामगिरी बजावलेली आहे ते पुरुष तरुणपणी विक्षिप्तच असल्याचे आपण पाहतो. अशा विक्षिप्तपणाला पायबंद घातल्यास कर्तृत्वशाली पुरुषांची मालिकाच खुंटेल. शैक्षणिक तत्त्वज्ञानात व व्यवहारात हे तत्व गोवणे कठीण आहे. लोकांनी समाजाचा अवश्य विचार केला पाहिजे परंतु याचा अर्थ असा नव्हे की सर्व व्यक्ती एकसारख्याच असाव्यात. असाधारण कर्तृत्वाचे मूळ असाधारण व्यक्तिमत्त्वामध्येच असते.

इतिहासातून विविध प्रकारचे ज्ञान कसे मिळते व इतिहासाच्या परिशीलनाने आनंद कसा होतो हे आपण पाहिले. परंतु याहूनही अधिक व्यापक आणि सखोल संस्कार आपल्या मनावर इतिहासाच्या अध्ययनामुळे होत असतात. केवळ शारीरिकदृष्टचा विचार केला तर आपल्या जीवनाची व्याप्ती काळ आणि अवकाश यांचाच विचार केला तर अगदीच मर्यादित आहे. परंतु आपल्या मानसिक जीवनात या मर्यादेचे बंधन आपल्यावर राहण्याचे कारण नाही. खगोलशास्त्राच्या अभ्यासामुळे ज्याप्रमाणे आपल्याला दिक्कालासंबंधी एक नवीन दृष्टिकोन येतो त्याचप्रमाणे इतिहासाच्या अध्ययनामुळे मानवी जीवनाकडे आपण एका नवीन आणि व्यापक दृष्टिकोनातून पाहू शकतो. अखिल मानव समाजाचा आणि संस्कृतीच्या इतिहासाच्या विचार करताना आपले वैयक्तिक जीवन किती क्षणभंगुर आहे. आपल्या वैय्यक्तिक जीवनातील सुखदुःखांचे महत्त्व किती क्षुल्लक आहे अशी नवी जाणीव निर्माण होते. वैय्यक्तिक जीवनात अपरिहार्य असलेली सुखदुःखे सहन करण्याचे सामर्थ्य अंगी बाणते. मानवी संस्कृतीचा विचार करता प्रगतीबरोबर अधोगती झाल्याचेही आढळून येते. परंतु एकूण विचार करता आपल्या ज्ञानात पुष्कळच भर पडली आहे यात संशय नाही. निसर्गावर

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तर आपण बरेच प्रभुत्व संपादन केले आहे. रोगराई पुष्कळच आटोक्यात आणली आहे आणि नैसर्गिक आपत्तींना आपण यशस्वीरीत्या तोंड देऊ शकतो. अर्थात हे मात्र खरे की आपण एकमेकापासून आपले संरक्षण करू शकत नाही. माणूसच माणसाचा मोठा शत्रू आहे परंतु याबाबत प्राथमिक स्वरूपाची का होईना आपण तयारी केली आहे. हिंसक कृत्ये आज संघटितरीत्या सरकारतर्फे होत असतात. पूर्वीच्या काळी अकस्मात उद्भवणाऱ्या हिंसाचारापेक्षा ह्या कृत्यांना पायबंद घालणे अधिक सुलभ आहे.

इतिहासामुळे आपल्याला येणाऱ्या दृष्टिकोनामुळे कोणत्या घटना आणि कोणत्या गोष्टी चिरकालीन महत्त्वाच्या आहेत हे आपण अधिक स्पष्टपणे पाहू शकतो. गॅलिलिओच्या काळी ३० वर्षांचे दीर्घ कालीन युद्ध चालू होते. समकालीन लोकांना तेच फार महत्त्वाचे वाटत होते. गॅलिलिओच्या संशोधनाचे महत्त्व त्यांना उमगलेच नाही. ते दीर्घकालीन युद्ध निरर्थक होते तर गॅलिलिओच्या संशोधनामुळे एका नव्या युगाची सुरवात झाली हे आज आपण पाहू शकतो. ग्लॅडस्टनने डार्विनला भेट दिली तेव्हा डार्विनला कृतकृत्य वाटले. परंतु त्यामध्ये त्याच्या विनम्रतेचा प्रत्यय आला तरी ऐतिहासिक दृष्टीचा अभावच होता. आपल्या कार्याचे दूरगामी महत्त्व त्याच्या लक्षातच आले नाही. परंतु इतिहासाच्या परिशीलनामुळे दैनंदिन घटनांचे आपण शांतपणे आणि विचारपूर्वक मूल्यमापन करू शकतो. धार्मिक तत्त्ववेत्ते असे म्हणतात की देवाला भविष्य काळ व भूतकाळ वर्तमानकाळाप्रमाणेच दिसतात. माणसामध्ये हे सामर्थ्य नाही. परंतु अशा रीतीने विचार करणे सुज्ञतेचे आणि विचारशीलतेचे निदर्शक आहे. वर्तमानकाळात आपण वावरतो आणि वर्तमानकाळात आपले सर्व कार्य होत असते. परंतु कृती हेच जीवनाचे सर्वस्व नव्हे आणि क्षणिक भावना बाजूस ठेवून दूरवर विचार करून केलेली कृतीच श्रेष्ठ होय. मानव हा मर्त्य आहे. आणि अनेकांचा तर मागोसाच रहात नाही. काही आपल्या चांगल्या वाईट कृत्यांचा वारसा पुढील पिढ्यांना देत असतात. इतिहासाच्या अभ्यासामुळे ज्याच्या बुद्धीला परिपक्वता आलेली आहे अशी व्यक्ती भावी पिढ्यांना चांगल्या वाटतील अशा गोष्टी करण्यातच कार्यमग्न झालेली असते.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. बाबूराव चंदावार

# असंतोष नाही हितविरोध आहे

१

आजची आर्थिक, सामाजिक व राजकीय व्यवस्था कोणालाच समाधान देणारी नाही. म्हणून सगळीकडे निदर्शने, घेराव, सत्याग्रह ( ? ), प्रतिकार, नि:शस्त्र व सशस्त्र संघर्ष घडताना रोज दृष्टीस पडत आहेत. या सर्व प्रकारातून समाजातला असंतोष प्रगट होत आहे, असा समजही करून घेतला जात आहे. पण हे सर्व प्रकार असंतोषाचे आहेत कि हितविरोधाचे आहेत याचा उलगडा झाला पाहिजे. त्याशिवाय समाजातला असंतोष प्रगट होत आहे हे ठरविता यावयाचे नाही. जे प्रगट होत आहे ते हितविरोधाच्या परिस्थितीतून निर्माण झालेल्या व्यवस्थेतला अंतर्विरोध आहे, असेच मानावे लागते. कारण हितविरोध कायम ठेवून सर्वांना समाधान देणारी समाजव्यवस्था अस्तित्वात येऊ शकत नाही. जी येते असे वाटते ती शोषणकारी व्यवस्था असते. अशा व्यवस्थेतच अंतर्विरोध असतातही. तेव्हा, हितविरोधातून निर्माण होणारे संघर्षाचे आजचे अनेक प्रकार हे सामाजिक असंतोषाचे प्रकार नसून हितविरोधाची समाजस्थिति प्रगट करू पहाणारा अंतर्विरोध आहे. म्हणून अशा अंतर्विरोधातून वर्गकलह माजेल. तेव्हा आज दिसणारे संघर्ष वर्गकलह माजविणारे आहेत असेच म्हणता येईल. पण सर्वांना समाधान देणारी समाजव्यवस्था वर्गकलहातून अस्तित्वात येत नाही. ती आणावयाची असल्यास हितविरोध नाहीसा व्हावा लागतो. तो कशामुळे नाहीसा होईल हा समाजव्यवस्था अस्तित्वात आणण्याच्या दृष्टीने अत्यंत महत्वाचा प्रश्न आहे.

२

संघर्ष हितविरोधातून जन्माला येतो. म्हणून हा संघर्ष मानवीय संबंध अस्तित्वात आणणारा नसतो. अर्थात याला पर्याय हवा. ज्यामुळे मानवीय संबंध अस्तित्वात येतील. म्हणून पर्याय शोधल्याशिवाय तरणोपाय नाही. सर्वांचे हितसंवर्धन साधावयाचे तर हितविरोधाच्या ऐवजी हितैक्याचा स्वीकार करावा लागेल. म्हणजे हितैक्यातून हितसंवर्धन होईल पण परंपरेने चालत आलेल्या समाजशास्त्रात हितैक्याचे स्थान नाही; हितविरोधाचेच आहे. म्हणून

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

समाजशास्त्र विश्वासाच्या आधारावर विकसित न होता अविश्वासाच्या आधारावर बनविले गेले आहे. तेव्हा विश्वासाला समाजशास्त्राचा आधार बनविण्याचा प्रश्न आहे. हितविरोध किंवा अविश्वास समाजशास्त्राचा आधार कसा बनला हेही लक्षात घ्यावेच लागेल. त्याशिवाय परंपरागत समाजशास्त्राची चूक लक्षात येणार नाही.

३

समाज संबंधातून अस्तित्वात येतो. तरी संबंध मानवीय असावे लागतात. म्हणून मानवीय संबंधातून समाज अस्तित्वात येतो म्हणणेच योग्य होईल. मानवीय संबंध मनुष्यप्रवृत्तीतून प्रगटतात. तेव्हा माणसातली संबंध प्रगटायला उपयोगी प्रवृत्तीच विकसित व्हावी लागते. अर्थात समाज बनायला उपयोगी आणि अनुपयोगी अशा दोन प्रवृत्त्या माणसात आहेत. ज्याला सत्–असत् किंवा सुरासुर प्रवृत्ति म्हणता येईल. असुर किंवा असत् प्रवृत्ति मानवीय नाही. सुर किंवा सत् प्रवृत्ति मानवीय आहे. म्हणून असुर प्रवृत्तीचे किंवा असत् प्रवृत्तीचे नियंत्रण करावयाचे, सुर किंवा सत्प्रवृत्तीची वृद्धि करावयाची. असुर किंवा असत्प्रवृत्तीचे नियंत्रण करणे माणसाला अशक्य झाले म्हणून तिच्या नियंत्रणासाठी माणसाने दंडशक्तीचा आधार घेतला. धर्म आणि राज्य या दोन संस्था यांतूनच अस्तित्वात आल्या. धर्म आणि राज्याची दंडशक्ति असुर किंवा असत्-प्रवृत्तीचे नियंत्रण करू लागली. म्हणून या नियंत्रणातून संचालन अस्तित्वात आले. यावेळेपासूनच दंडशक्तीचा आधार असलेले संचालन समाजाचे संचालन करण्यासाठी आवश्यक मानले जाऊ लागले. पण संचालन दंडशक्तीच्या आधाराशिवाय अस्तित्वात येत नाही ही एक माणसाची श्रद्धाही बनली. अर्थात समाज अस्तित्वात आणण्यासाठी संबंध निर्माण करताना ही श्रद्धा अडसर बनू लागली. कारण, संबंध निर्माणातून दंडशक्तीचे प्रयोजन नाहीसे होते व तिचे अवमूल्यन होत जाते. ते तसे होऊ नये असे या श्रद्धेला वाटू लागले. पण संचालन दंडशक्तीच्या आधारावर निर्माण झाल्यामुळे दंडशक्ति केवळ असत् प्रवृत्तींचेच नियंत्रण न करता सत्प्रवृत्तीचेही नियंत्रण करू लागली. यामुळे संबंधातून समाज अतित्वात आणताना दंडशक्तीची अनुमती असणे आवश्यक होऊन बसले. तेव्हा, दंडशक्ती असुर प्रवृत्ति नियंत्रित करण्यासाठी माणसाने स्वीकारली असली तरी दंडशक्तीचा स्वभाव केवळ असुर-प्रवृत्तीचेच नियंत्रण करण्याचा नाही. सुरप्रवृत्तीचेही नियंत्रण करण्याचा आहे. म्हणजे माणसाने त्याच्या दुबळेपणामुळेच दंडशक्तीचे संचालन स्वीकारले. म्हणून दंडशक्तीचे अस्तित्व



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अमान्य करून किंवा दंडशक्तीच्या अनुमतीशिवाय समाजाच्या अस्तित्वासाठी संबंध निर्माण करणे शक्य होत नाही, अशी अंधश्रद्धा आज सर्वत्र दिसते. पण या अंधश्रद्धेचा नेमका अनिष्ट परिणाम तो कोणता हे मात्र ओळखता आले पाहिजे.

४

समाज अस्तित्वात यायला आवश्यक असलेल्या संबंधांना दंडशक्तिवर जडलेली अंधश्रद्धा बाधक ठरते. म्हणून संबंधातून समाज अस्तित्वात येण्याची प्रक्रियाच थांबते. या ऐवजी नियंत्रणातून समाज ( ? ) अस्तित्वात आणण्याचा प्रयत्न दंडशक्तीकडून होतो. संबंध आणि नियंत्रण या दोहोतला फरक लक्षात येण्यास अडचण पडणार नाही. कारण, संबंध माणसातले असतात. नियंत्रण दंडशक्तीच्या संचालनाचे असते. संचालनातून नियंत्रण केले जाईल तेव्हा माणसाचे मानवीय स्वरूपच नाहिसे होत जाईल. म्हणून नियंत्रणातून मानवीयताच नाहीशी होईल. संबंधातून मानवीयता विकसित केली जाते. म्हणून संबंधातून समाज अस्तित्वात येतो. समाज माणसांचा असतो. अर्थात नियंत्रण माणसाच्या समाजाला उपयोगी नसते. तेव्हा, नियंत्रणाचा प्रभाव वाढल्यास माणसांचा समाज अस्तित्वात येण्याऐवजी माणसांचा कळपच अस्तित्वात येईल. कारण, असत् किंवा असुर प्रवृत्ती बरोबर सत् किंवा सुर प्रवृत्तीचे नियंत्रण झाल्यास कळपाला आवश्यक असलेला न्यायच अस्तित्वात येईल. म्हणून माणसांना आवश्यक असलेला न्याय हा दंडशक्तीतून कधीच अस्तित्वात येत नाही. दंडशक्तीतून अस्तित्वात येणारा न्याय हा कळपांसाठीच असतो. तेव्हा माणसाचे मानवीय स्वरूप विकसित व्हायचे कसे असा प्रश्न आहे. दंडशक्तीचा स्वीकार केल्यास माणसाचे मानवीय स्वरुपच शिल्लक राहणार नाही. आणि दंडशक्तीला स्वीकारायचेच नाही असे ठरविले तर मानवीय संबंधच विकसित करावे लागतील. अर्थात या संबंधांवर दंडशक्तीचा कोणताच परिणाम होता कामा नये, इतका प्रभाव निर्माण करावा लागेल. पण दंडशक्तीचा संबंधात हस्तक्षेप होत राहणार आहे. कारण तो दंडशक्तीचा स्वभावच आहे. म्हणून संबंध निर्माण करण्याचा माणसाचा स्वभाव संपूर्ण सामर्थ्यानिशी प्रगटला पाहिजे. तो प्रगटायचा कसा हा या बाबतीतला प्रश्न आहे.

५

मनुष्याच्या संबंधात दंडशक्तीचा हस्तक्षेप मान्य होऊ लागतो तेव्हा ( यातून ) निर्माण होणाऱ्या समाजशास्त्राचा अविश्वास हा आधार होऊन बसतो आणि अविश्वासातून हितविरोध विकसित होत जातो. वर्गभावनेचा

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

परिपोष मुळांत या हितविरोधातून होत असतो. तेव्हा माणसाचे संघर्षमय जीवन घडते ते समाजशास्त्राचा आधार– अविश्वास असतो म्हणून. या उलट मनुष्याच्या संबंधात दंडशक्तीची आवश्यकता वा हस्तक्षेप मान्य न करता निर्माण होणाऱ्या समाजशास्त्राचा विश्वास हा आधार असतो. विश्वासात हितविरोध नाही. हितैक्य आहे. यात वर्गभावनेचा परिपोष होण्याचे कारणच शिल्लक राहत नाही. म्हणून माणसातला संघर्ष प्रगट न होता सहयोग प्रगट होतो. संघर्षाऐवजी सहयोग प्रगट होण्यातून समाजाचे अस्तित्व बनू शकते. आणि या समाजाची सांस्कृतिक पातळीही निर्माण होते. संघर्षातून सांस्कृतिक पातळी निर्माण होत नाही. ती सहयोगातूनच निर्माण होते.

६

माणसाच्या प्रगतीचा मार्ग हा माणसाला संस्कृतीची पातळी निर्माण करून देण्याचा आहे. आणि तो चालण्यानेच माणसाचे पुरोगामित्व सिद्ध होत असते. प्रगतीच्या मार्गात दंडशक्तीचा अडसर निर्माण झाला आहे. तो नाहीसा करावयाचा तर माणसाला संचालनपद्धतीच नाहीशी करावी लागेल. असत् प्रवृत्तीचे नियंत्रण करण्यासाठी दंडशक्तीचा आधार घेण्याऐवजी आत्मशक्तीचा आधार घ्यावा लागेल. दंडशक्तीचा आधार घेऊन स्वतःच्या असत् प्रवृत्तींचे नियंत्रण करण्याचा माणसातला प्रगट झालेला दुबळेपणा मनुष्यसंस्कृतीच्या ऱ्हासाचे कारण झाले आहे. हे त्याला समजावे लागेल. आणि हे त्याला समजले की प्रगतीचा मार्ग चालण्यासाठी त्याच्यात पुरेशा प्रमाणात पुरोगामीत्व आले आहे असे म्हणता येईल. म्हणून माणसाला संघर्ष करावयाचे त्याच्यातल्या दुबळेपणाविरुद्ध. इतर कोणाविरुद्ध नव्हे. हा संघर्ष तीव्र, तीव्रतर, तीव्रतम झाला पाहिजे. पण संबंधासाठी माणसातला सहयोग सूक्ष्म, सूक्ष्मतर, सूक्ष्मतम पद्धतीने जीवनात भिनला पाहिजे. जीवनात सहयोग भिनला की माणसाच्या दुबळेपणा-विरुद्ध करावयाच्या संघर्षात तो टिकून राहील. तात्पर्य असे की दंडशक्तीचा आधार सोडून आत्मशक्तीचा आधार माणसाला घ्यावा लागेल.

७

माणसाचा दुबळेपणा घालविण्याचा उपाय आत्मशक्ती प्रगट होणे हा आहे. म्हणून संचालनाच्या अनिष्ट रूढी किंवा परंपरांचा प्रभाव नाहीसा करण्यासाठी आत्मशक्ति कशी उपयोगात आणावयाची हेही लक्षात यावे लागेल. कारण, संचालनपद्धतीची एक दीर्घ परंपरा आहे हे नाकारता येत नाही. ही परंपराच मनुष्यजीवनातून घालवायची तर तिच्याशी संघर्ष हा होणारच, पण संघर्ष



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संचालनपद्धतीच्या विरुद्ध असल्यामुळे तो माणसांशी होत नाही. माणसांच्या दुबळेपणाशी होतो. दुबळेपणा असत् प्रवृत्ति आहे. म्हणजेच असत्य आहे. तेव्हा, संघर्ष असत्याविरुद्ध सत्य असा होईल. अर्थात हा संघर्ष सत्य–असत्याचा उलगडा होण्याचा असेल. म्हणून या ठिकाणी संघर्ष गळून पडतो, सत्याग्रहच शिल्लक राहतो. अर्थात संचालनपद्धति नाहीशी करण्यासाठी सत्याग्रहाचा स्वीकार करावा लागतो.

माणसाच्या दुबळेपणातून दंडशक्तीचे संचालन आले. आणि संचालनातून माणसाचा दुबळेपणा वाढतच गेला. तो वाढला नसता तर दंडशक्तीची माणसावरची पक्कड घट्ट झाली नसती. माणसात भीती निर्माण केल्यानेच दुबळेपणा येतो. म्हणून दंडशक्ती माणसातली भीती सतत वाढवीत असते. ती वाढविली नसती, तर दंडशक्तीची माणसाला भीती वाटली नसती. दंडशक्ति-विषयी माणसाला आस्था नाही, पण भीती आहे. दंडशक्ती माणसाला उपद्रव देणारी आहे म्हणून ही भीती आहे. अर्थात या ठिकाणी उपद्रव आक्रमणाचे रूप घेते. भीतीतून आक्रमण येते. म्हणून आक्रमण निर्भयतेचे लक्षण नसून भीतीचे लक्षण आहे. दंडशक्तीचे प्रयोजन नकोसे करावयाचे तर माणसाला दंडशक्तीची वाटणारी भीती नाहीशी झाली पाहिजे. म्हणजे संचालनापासून मुक्त होऊन माणसाने स्वचालन स्वीकारले पाहिजे. संचालनात मनुष्य भीतीयुक्त राहीलच. शिवाय भीती सतत वाढतही जाईल. स्वचालनात माणूस भीतीमुक्त होईल. संचालनपद्धति नको म्हणून सत्याग्रहाचा स्वीकार करायचा. अर्थात सत्याग्रहाचे साधन वापरून माणसाला भीतीमुक्त करावयाचे. तेव्हा, भीतीचे भांडवल करून माणसातली आक्रमकता वाढवल्याने सत्याग्रह होणार नाही. असे जर केले तर संचालन जाणार नाही. एकाचे किंवा गटाचे वा एका वर्गाचे जाऊन दुसऱ्याचे किंवा दुसऱ्या गटाचे वा दुसऱ्या वर्गाचे संचालन येईल. तात्पर्य असे की, सत्याग्रह भीतीतून निर्माण होणाऱ्या कोणत्याच क्षोभातून अस्तित्वात येऊ शकणार नाही अर्थात सत्याग्रह क्षोभरहित असावा लागतो. निर्भयतेचा म्हणजेच निश्चयाचा असावा लागतो. असा सत्याग्रहच उपद्रवकारी नसतो. म्हणजे कोणालाही उपद्रव देणे हा सत्याग्रहाचा उद्देश असू शकत नाही. तसा असेल तर तो सत्याग्रहच नव्हे असेच मानले पाहिजे.

९

सत्याग्रह जसा भय निरसनासाठी असतो तसा तो अज्ञान व मोह निरसनासाठीही असतो. अन्याय निवारण करण्यासाठी असतो असे आज मानले



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जात आहे. पण संचालनपद्धति अस्तित्वात आहे तोवर तरी न्याय संचालनातूनच निर्माण झालेला असेल. म्हणून न्यायाचे संरक्षण करणे म्हणजे संचालनाचेच संरक्षण करणे असेल. तेव्हा, न्यायरक्षणातून दंडशक्तीचे प्रयोजनच सिद्ध केले जाते. म्हणून न्याय स्थापनेसाठी सत्याग्रह होऊ शकतो म्हणणे योग्य नाही. सामाजिक न्यायाचे बुजगावणेही उभे केले जाते. पण सामाजिक न्याय दंडशक्ति अस्तित्वात आहे तोवर अस्तित्वातच येणार नाही. कारण सामाजिक न्याय समाजाच्या गरजेतून अस्तित्वात येतो. पण जिथे समाजच अस्तित्वात नाही तिथे सामाजिक न्याय कसा येणार ? तेव्हा, समाज अस्तित्वात आणण्यासाठी प्रथम दंडशक्तीचा विलय व्हावा लागेल. त्या विलयाची प्रक्रिया सुरू झाली तरच सामाजिकता यायला सुरुवात होईल. व तिचा न्याय अस्तित्वात येईल. हा न्याय म्हणजेच संस्कृति असेल. सांस्कृतिक पातळी म्हणजे न्यायाची पातळी मानायची. पण दंडशक्तीचा विलय झाल्यानंतर न्याय असणार नाही. संस्कृतीच असेल. संस्कृतीच्या पातळीत मनुष्य दंडनीय असणार नाही. दंडशक्ति माणसाला दंडित करते म्हणून दंडशक्तीचाच न्याय अस्तित्वात येतो. तिच्या विलयानंतर तिचा न्यायही नसतो. फक्त सांस्कृतिक पातळी असते. या पातळीतच समाजाचे अस्तित्व असते. पण समाजाचा न्याय नसतो. आचारसंहिता असते. आचारसंहिता आणि न्याय या दोन गोष्टी भिन्न आहेत. न्याय न्यायसंस्था अस्तित्वात आणते. आचारसंहितेला संस्था नसते. व्यक्ति संस्थामुक्त असते. म्हणून तिच्या स्वतःच्या आत्मप्रेरणेतून तिचे आचरण बनत जाते. आचार-संहिता आत्मप्रेरणेतून अस्तित्वात येते. न्यायसंस्था आत्म-प्रेरणेतून येत नाही. दंडशक्तीतून येते. नियंत्रणातून नव्हे तर मनुष्याच्या प्रेरणेतून समाज अस्तित्वात यावा. याचसाठी संस्था आणि संचालन नको. न्याय नियंत्रणासाठी असतो. प्रेरणा आचरणासाठी असते. दंडशक्तीची दहशत निर्माण करून माणसाला उपद्रव देत न्याय निर्मिला जातो. प्रेरणेतून नव्हे. प्रेरणा माणसालाच होत असते. म्हणून प्रेरणेतून येईल ते न्याय असणार नाही. आचरण असेल. सर्वांचे आचरण एकत्र आले की त्यांची संहिता बनेल. तेव्हा, समाज अस्तित्वात आला की समाजाचा न्याय असणार नाही. समाजाची आचारसंहिताच असेल.

## १०

भयातून मनुष्य आक्रमक बनतो. आणि भयामुळेच तो मोहबंधनात अडकूनही राहतो. हेच माणसाचे खरे अज्ञान आहे. यातून माणसाची सुटका

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

व्हावी हे सत्याग्रहाला अभिप्रेत आहे. म्हणून सत्याच्या आग्रहातून माणसाला मोहमुक्त करावयाचे असते. म्हणजे सत्याग्रहाला माणसाच्या ज्ञानाची दारे उघडी करायची असतात. तेव्हा, सत्याग्रहाने भीती नाहीशी करावयाची, तसेच मोह बंधनातूनही माणसाला मुक्त करावयाचे. मोह अज्ञान आहे. पण मोहाचा पडदा उठल्याशिवाय ज्ञान व्हायचे नाही. अर्थात हा पडदा हटवायचा कसा हा प्रश्न आहे. आणि हा पडदा हटविण्यासाठीच सत्याग्रहाचा आधार घ्यावा लागतो. म्हणून सत्याग्रह आत्मशुद्धीच्या मार्गातून प्रगटावा लागतो. प्रतिकाराच्या मार्गातून नव्हे. प्रतिकारातून मोह-मुक्ति साधत नाही. प्रतिकारातून प्रतिक्रिया जन्मते. म्हणून संघर्ष उद्भवतो. आत्मशुद्धीचा मार्ग हा विश्वास संपादन करण्याचा मार्ग आहे. प्रेम प्रगटल्याशिवाय कोणाचा कोणावर विश्वास जडत नाही. तेव्हा आत्मशुद्धीचा मार्ग प्रेम प्रगट करण्यासाठी आहे. या ठिकाणी सत्याग्रहाचा उद्देश प्रेम प्रगट करणे हा होऊन बसतो. म्हणून सत्याग्रहात फार मोठी तटस्थता लागते. या तटस्थतेमुळे माणूस मानसिक संकल्प–विकल्पाच्या पातळीवरून वर उठतो. आत्मशक्तीचे सान्निध्य साधतो. मनाच्या वर उठल्याशिवाय आत्मशक्तीचे सान्निध्य मिळू शकत नाही. आणि अशा सान्निध्याशिवाय माणसाला तटस्थता लाभत नाही. तात्पर्य असे की मोहनिरसनासाठी सत्याग्रहातून प्रेम प्रगटावे लागते. कारण प्रेमाने विश्वास संपादता येतो. 'असुर वृत्ति नियंत्रित करण्यासाठी माणसाने घेतलेला दंडशक्तीचा आधार काढून टाकावा व आत्मशक्तीचा आधार घ्यावा' असे म्हटले गेले; ते याचसाठी कि असुर वृत्ति भीती व मोहातून बनत असते म्हणून ! पण भीती आणि मोह ऐतिहासिक सत्य असल्यामुळे यांच्यात बदल करता येणार नाही, असा एक सिद्धांत मांडला जातो. अर्थात या सिद्धांतानुसार 'भीती व मोहाचे निरसन होणार नाही व असुरवृत्ति नियंत्रित केली जाणार नाही' असेच मानले जाते. म्हणजे 'असुरवृत्तीचा प्रतिकार करून तिचा नायनाट करण्यासाठी दंडशक्तीचे अस्तित्व अपरिहार्यच होऊन बसते. कारण शक्तीच्या साह्यानेच प्रतिकार करता येऊ शकेल. अन्य कशानेच नव्हे' हे यात गृहीत धरलेले आहे. अर्थात या सिद्धांतानुसार माणूस थांबणार असेल तर तो प्रगतीची वाट चालू शकणार नाही. म्हणजे आज पोचला आहे त्या ठिकाणीच त्याला मुक्काम करावा लागेल पण वैफल्यातूनच ऐतिहासिक सिद्धांत मांडला जातो. म्हणून तो प्रतिगामी आहे. पुरोगामी नव्हे. 'प्रगतीचा मार्ग खूप चालायचा आहे. चालतच राहायचे आहे.' हाच ज्यांचा आनंद होऊन बसतो ते पुरोगामी. म्हणून अशा पुरोगाम्यांना कधीच वैफल्य येणार नाही. आजवर आले नाही.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

११

भिन्न वर्गांचा हितविरोध किंवा व्यवस्थेतला अंतर्विरोध प्रगटतो तेव्हा मानवी जीवनातले वैफल्य उघड होते. पण हे वैफल्य म्हणजे असमाधान नव्हे. या वैफल्यात आकांक्षा सत्ता प्राप्त करण्याची असते. आवश्यकतेची पूर्ति व्हावी ही आकांक्षा नसते. सत्तेच्या भावनेत स्वामित्व आहे. गरजपूर्ति व्हावी या भावनेत सर्वांविषयी सहानुभूति आहे. सहानुभूतीतून जीवनपद्धतीच्या बदलाची मागणी होत असते. स्वामित्वातून सत्ता गाजविण्याची मागणी होत असते. तेव्हा, भिन्न वर्गांच्या वैफल्यातून बनू पहाणारी आकांक्षा ही सत्ता गाजविण्याची आकांक्षा आहे; पद्धति बदलाची आकांक्षा नव्हे. अशा वेळी भिन्न वर्गातले धूर्त वर्ग स्वतःची सत्ता अस्तित्वात आणतात. ते अन्य वर्गांना स्वतःच्या आधिपत्याखाली ठेवतात. यातून जीवनाची पद्धती बदलत नाही. स्वचालन येत नाही. दंडशक्तीच्या आधारावरच नवे संचालन अस्तित्वात येते. पण ज्याला असमाधान म्हणता येईल ते वेगळेच असते. तिची लक्षणे वेगळीच असतात. संचालनपद्धतीच्या अनिष्ट परिणामांचा शोध हे असमाधान घेत असते. म्हणून असमाधानातून जीवनपद्धति बदलण्याची मागणी सुबुद्धपणे पुढे येते. जीवनपद्धति संचालनाची असल्यामुळे सुबुद्धपणेच संचालन नको म्हटले जाते. संचालन नको म्हणजे दंडशक्ति नको. या नको म्हणण्यातून माणसाविषयीची सहानुभूति व्यक्त होते. सत्तेची आकांक्षा व्यक्त होत नाही. तेव्हा, माणसाविषयी वाटणाऱ्या सहानुभूतीतून माणसांचा असंतोष प्रगटतो. आणि हा असंतोष माणसांचे माणसांशी नाते असल्याचे उघड करतो. जिथे माणसांशी नाते जुळते तिथे संचालनाचे नाते तुटते. नाते जुळते तेव्हा माणसांचा सहयोग प्रगटतो. ते तुटते तेव्हा असहयोग प्रगटतो. असमाधानातून माणसांचे माणसांशी नाते जुळते म्हणून माणसामाणसात सहयोग प्रगटतो. पण याचाच स्वाभाविक परिणाम असा होतो की माणसांचे संचालनाशी असलेले नाते तुटते. संचालनाशी माणसांचा असहकार होतो. माणसांशी नाते जोडायचे व संचालनाचे नाते तोडायचे. हा असंतोष.

तात्पर्य असे की सध्या रोज दिसणारे संघर्ष असंतोषाचे नव्हेत. तर हितविरोधाचे आहेत. असंतोष अजून प्रगटायचाच आहे !

◆ ◆ ◆

अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. नागनाथ कोत्तापल्ले

# बालकवींची कविता : चार टिपणे

## टिपण १ : बालकवींचे निसर्गाकलन

बालकवी मराठीतील पहिले निसर्गकवी आहेत असे म्हणत असताना अनेक प्रश्न निर्माण होतात. या पूर्वीच्या कवितेतून निसर्ग आलाच नव्हता का ? आणि आला असेल तर बालकवी कोठे वेगळे वाटतात ? त्यांचे सामर्थ्य कशात आहे ? इत्यादी प्रश्न त्यांच्या कवितेच्या संदर्भात उपस्थित होतात. त्यांच्या-पूर्वी केशवसुतांनी आणि त्याही पूर्वी ज्ञानेश्वरापासून ते शाहिरापर्यंतच्या कवितेत निसर्गाचे संदर्भ येतातच. मग बालकवी हे मागच्या कवींपेक्षा वेगळे कसे ? हा प्रश्न अतिशय प्राथमिक स्वरूपाचा आणि अनेकांनी सोडवलेला आहे. यात शंका नाही. परंतु तरीही हा प्रश्न मी पुन्हा उपस्थित केला आहे तो त्यांच्या कवितेच्या जवळ जाण्याच्या एका प्रयत्नात.

अर्थात हा प्रश्न समजावून घेण्याआधी बालकवींची निसर्गाविषयीची काय कल्पना आहे हे समजावून घेतले पाहिजे. त्यांची कविता वाचत असताना निसर्ग असा शब्द कोठेच येत नाही. येतो फक्त "सृष्टी" असा शब्द. अर्थात निसर्ग आणि सृष्टी हे स्थूल अर्थाने एकाच अर्थाचे शब्द आहेत. निदान रूढीने त्यांचे एकच अर्थ आहेत असे आपण गृहीत धरतो. मग बालकवींची सृष्टी-विषयक काय कल्पना आहे हे पाहणे आवश्यक आहे.

१) सांजचती वर्णावी कैशी गीती ?
त्या छाया कवि होता अवलोकाया;
कौतुकला शब्द परि न फुटे त्याला;
मूकपणे अक्षम गुंगे हेच मनी
गोडभली फुलपाखरु- फुल वेली. ( फुलपाखरू–फुलवेली. )

२) तुजला बघता भरभर उडता, कविता आठवली;
कशी बशी ती त्वत्प्रीतीस्तव या कवनी लिहिली. ( बालविहग. )

३) उंच भराऱ्या मारित जाणे । रूप तुझे गोजिरवाणे ।
गुंगुन जाईल चित्त जयाने । दे, दे ते गाणे । ( आनंदी पक्षी )



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अशा प्रकारे अनेक कवितांमधून येणारे उल्लेख मोठे महत्वाचे आहेत. एका प्रकारे बालकवी स्वतःची असमर्थता तर दाखवीत नाहीत ? ही एका-प्रकारे असमर्थता असू शकेल परंतु या त्यांच्या असमर्थतेवरती आपले लक्ष केंद्रित होतच नाही. त्यांना त्या त्या ठिकाणी वर्ण्याचे अलौकिकत्व दाखवायचे असते; आणि वर्ण्याशी एकरूप व्हायची इच्छा ते व्यक्त करताहेत, हेही जाणवते. तेव्हा हे जे वर्ण्य आहे ते कसे आहे ?

१) तेजानं न्हाणिले जगाला कोण सखे बाई ?
नवल अगाई ! तेजोमय तू ? तेजोमय मीही ! ( अरुण )

२) काळ्या अंधारात खेळते विश्व लपंडाव
ताऱ्यावरती बसून बघती ते कौतुक देव ( संध्यारजनी ) !

३) उठती वरती जलदावरती अनंत संध्या राग पहा
सर्व नभावर होय रेखिले सुंदरतेचे रूप महा ( श्रावणमास )

— अशा प्रकारच्या कविता बघितल्यानंतर बालकवींच्या दृष्टीने फक्त पाने, फूल, वारा, तारे, आकाश एवढेच कांही त्यांना निसर्ग म्हणून अभिप्रेत नव्हते. तर एका व्यापक अर्थाने या सृष्टीत जे जे चैतन्यपूर्ण दिसते ते ते अभिप्रेत होते. अंधारापासून ते अरुणचिताऱ्यापर्यंत आणि तृणपुष्पापासून ते बालविहगापर्यंत त्यांना संपूर्ण सृष्टीच अभिप्रेत होती. आपण सगळे सृष्टीने बांधलेले आहोत अशी बालकवींची सृष्टिसंबंधीची अपरिहार्यता येते. त्यांच्याजवळ सृष्टीसंबंधीच्या बावळट कल्पना नाहीत आणि म्हणूनच त्यांनी निसर्गाऐवजी ( Nature ) सृष्टी हा शब्दतर वापरला नसावा ? यासंबंधी एक कविता या ठिकाणी द्यायला हरकत नाही. ती कविता त्यांची नाही असे कांही लोकांचे म्हणणे आहे. त्यांची असो; नसो; परंतु त्यांच्या काव्यवृत्तीच्या दर्शनासाठी ही कविता उपयोगी आहे :

“ वस्तु वस्तुमध्ये काव्य विलसते
श्रवणी नयनी हृदयी उतरुनी
पूर्ण करी जे जड जीवाते,
बाह्य वेश जरि सुंदर धरिते,
मंजुगीत त्या मधुनी स्फुरते
दिव्य अहा ! मग ते अवतरते
मी, तू पण ते क्षणी विसरविते
लावी अखंड ध्यास जीवाते

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तेव्हा बालकवींच्या दृष्टीने जो 'अलौकिक' 'दिव्य' असा निसर्ग आहे त्याच्याकडे बालकवी कशाप्रकारे जातात किंवा त्याचे आकलन बालकवी कशाप्रकारे करतात ? हा प्रश्न सोडविला की बालकवींचे वेगळेपण आणि मोठेपण समजून येईल. हाच प्रश्न आपणास बालकवींच्या प्रतिमा कशा निर्माण होतात आणि त्यांची संघटना कशी होते ? अशा स्वरुपात मांडता येईल.

बालकवी निसर्गाकडे कसे जातात यासंबंधी त्यांच्याच कांही ओळी बघू –

१) सुमकोषी आपोआप । क्षण घ्यावी साखर झोप
डोलतची जाणे व्हावे । हासतची गुंगत जावे ।
सत्याची स्वप्ने व्हावी । सत्याला स्वप्ने यावी ।
स्वप्नी ही स्वप्ने बघत । स्वप्नातच व्हावा अंत (कवीची इच्छा)

२) ये प्रिय सखया, वनलतिकांच्या झोपाळचात बसून
गाऊ सुंदर गीत आपुले होऊ त्यात लीन (बालविहग)

एकंदरीत स्वप्नात सत्य, सत्यात स्वप्न आणि स्वप्नात पुन्हा स्वप्न आणि पुढे अंत याचा अर्थच असा की, याठिकाणी एकरूपता अभिप्रेत आहे. ही एकरूपता पराकोटीची आहे. इतकी की पुढे 'स्वप्नातच व्हावा अंत' असे म्हटलेले आहे. दुसऱ्या कवितेत वनलतिकांच्या सुंदर झोपाळचात 'लीन' होण्याची इच्छा आहे. या काही ओळी केवळ उदाहरणादाखल दिल्या आहेत. त्यांच्या कितीतरी कवितांमधून अशा प्रकारे सृष्टीशी एकरुप होण्याचे उल्लेख येतात. ही एकरूपता अतिउत्कटतेच्या टोकाला गेलेली दिसते. कविवृत्ती आणि निसर्ग वेगळा काढताच येत नाही. नृत्यलीन नर्तकीमध्ये नृत्य कोणते आणि नर्तिका कोणती हे सांगता येऊ नये तसे ! इतकी ही निसर्गाशी एकरूपता आहे हे अतिशय महत्वाचे आहे. अशी एकरूपता या पूर्वीच्या कवींना क्वचितच लाभते. एकतर पूर्वीचा आणि अजुनही कवितेत येणारा निसर्ग हा भावभावनांचा-संवेदनांचा वाहक असतो. आणि आपण त्यालाही निसर्ग कविताच म्हणतो. त्यासाठी आपण श्री ना. धों. महानोर यांची कविता समजावून घेऊ. अर्थात मी ज्या कविता उद्धृत करीत आहे तिची इतर सामर्थ्यस्थाने मला माहित नाहीत असा गैरसमज होण्याचे कारण नाही. किंवा ना. धों. महानोरांना मी कमी लेखतो अशातलाही भाग नाही किंवा महानोरांच्या इतर कविता अशाच आहेत असे मला अजिबात म्हणायचे नाही. मला मुद्दा असा मांडायचा आहे की, निसर्ग किंवा निसर्गातील घटक कसे वाहक बनतात —

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

१) राघू रानभर उडून जातात
हिरवी झाडे हिरमुसतात.
सायंकाळी वाट पाहून
आभाळागत बरसतात.

२) डोळे थकून थकून गेले
पाखरासारखा येऊन जा
रान भलतंच भरात, जरा
पिकात धुडगूस घालून जा.

– वरील कवितांमधून येणारा निसर्ग–अर्थात स्थूलपणे विचार करीत असतांना– कांही मानवी भावनांचा वाहक आहे हे उघड आहे. पहिल्या कवितेत 'राघू' 'हिरवी झाडे,' 'आभाळागत बरसणे,' 'वाट पाहाणे' यावरून कांही मानवी संदर्भ लक्षात येतात; आणि वाट पाहणे व बरसणे यासाठी राघू आणि हिरवी झाडे आलेली आहेत हे लक्षात येते. किंवा दुसऱ्या कवितेत येणारे भरातील रान आणि पाखरू ह्या प्रतिमा तिच्या वाट पाहाण्याचे आणि इच्छेचे वाहक आहेत असे लक्षात येते.

तेव्हा बालकवींचा निसर्ग असा वाहक आहे काय? असा खरा प्रश्न आहे. बालकवींची कविवृत्ती निसर्गाशी इतकी एकरूप होते की, कविवृत्ती आणि निसर्ग असे वेगळे राहातच नाहीत. त्यामुळे कुठल्या भावनेचे वाहक म्हणून निसर्गाने आपली कामगिरी पार पाडलेली आहे असे जाणवतच नाही. त्यांच्या कवितेवर-अनेक टीकाकार उदा :– अ. ना. देशपांडे, गंगाधर गाडगीळ; पाटणकर, इत्यादी. जेव्हा असे म्हणतात की, "बालकवींच्या कवितेत निसर्गावर भाव-भावनांचे आरोपण केले आहे." तेव्हा हे विवेचन बरोबर आहे असे वाटत नाही. या ठिकाणी बालकवींचा निसर्ग भावभावनांचे वाहक म्हणून काम करत नाही. तेव्हा आरोपण ह्या उपऱ्या प्रक्रियेचा दुरान्वयानेही संबंध येत नाही.

बालकवींना निसर्ग जाणवतो तोच मुळी भाव-भावनांनी युक्त. निसर्गाला बालकवी जसे वाहक म्हणून पाहू शकत नाहीत, किंवा निसर्गावरती भाव-भावनांचे आरोप करीत नाहीत तसेच भावना विरहितही ते निसर्गाकडे पाहू शकत नाहीत. तर भाव-भावना सहितच त्यांना निसर्ग दिसतो. किंबहुना आधी भाव-भावना की आधी निसर्ग? असा प्रश्नच त्यांच्या संदर्भात उपस्थित होण्याचे कारण उरत नाही. त्यांची कविता वाचत असताना "भावनानिष्ठ


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

समतानतेचाही " प्रश्न उद्‌भवत नाही. कारण त्यात दोन गोष्टीतील साधर्म्य अपेक्षित असते, परंतु याही पुढे जाऊन बालकवी इतके एकरूप होतात की, साधर्म्य कोणाशी ? कोणाचे ? असे प्रश्नच उपस्थित होऊ नयेत. एकंदरित या सगळचा प्रक्रियेत बालकवी निसर्गच उपभोग्य करतात. निसर्गाच्या माध्यमातून दुसरे काही उपभोग्य करीत नाहीत तर प्रत्यक्ष निसर्गच ते उपभोग्य करतात. आरोपणाचा प्रश्न या ठिकाणी उपस्थितच होऊ शकत नाही.

१) असा गिरीच्या अभिनव कुंजी निजला निजनाथ
बघता बघता त्यात रंगले वारुणिचे चित्त
हळूच पाहते, मधुर हासते, जाते लाजून
म्हणे मनाशी, 'जीव टाकू का हा ओवाळून' –(संध्यारजनी)

२) थवथवली ओथंबूनी खाली आली
जलदाली मज दिसली सायंकाळी – ( पाऊस )

३) तंद्रीतच अर्धी मुर्धी । लुकलुकते ताराराणी
ये झुंजुमुंजू तेजाने । पूर्वेवर पिवळे पाणी – (मोहिनी)

४) कुणी नाही ग कुणी नाही अम्हाला पाहत बाई –(तारकांचे गाणे)

५) गर्द सभोती रान साजने तू तर चाफेकळी
काय हरवले काय शोधिसी या यमुनेच्या जळी ?
– (तू तर चाफेकळी)

६) झाकळूनि जळ गोड काळिमा पसरी लाटांवर
पाय टाकुनी जळात बसला असला औदुंबर –(औदुंबर)

७) पवनाच्या अंदोलात देवदूत होते गात
आलिंगुनी आम्हाला ते हालविती गद्‌गद् हो ते –(गवताचे गाणे)

८) हे फुल या उडत्या स्वर्गातील
माणिक हे बाई गडे झुलते आहे. –(फुलपाखरू–फुलवेली)

वरील आठ उदाहरणे मी घेतली असली तरी अशा प्रकारची त्यांची सर्वच कविता आहे. त्यांच्या पूर्वार्धातील, मध्यातील, उत्तरार्धातील अशा या कविता आहेत. म्हणजे त्यांच्या निसर्गाकलनाची पद्धती ही शेवटपर्यंत एकच आहे हे उघड होते ती म्हणजे निसर्गाला उपयोग्य बनविणे हेच.

१) या कवितेत येणाऱ्या दोन प्रतिमा " निजनाथ " आणि "वारुणी " ह्या महत्वपूर्ण आहेत. इथे येणारा ' सूर्य ' हा कसा येतो ? तर संध्याकाळच्या


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अभिनव कुंजात निजूनच येतो. म्हणजे त्याचे आकलनच मुळात असे. 'वारुणी' ही येते तीच मुळी 'सूर्यात' रंगून जाणारी. 'सूर्य' आणि 'पश्चिमा' एकमेकात रंगलेली. या ठिकाणी पश्चिमा कुण्या प्रेयसीची वाहक होत नाही किंवा सूर्य कोणा प्रियकराचा वाहक होत नाही तर तेच मुळात प्रेयसी– प्रियकर होऊन येतात. बालकवी सूर्याचे आणि पश्चिमेचे आकलनच मुळी प्रियकर-प्रेयसीच्या रूपात करतात. येथे मानवी भावभावनांच्या आरोपणाचा किंवा उपमेचा प्रश्नच उपस्थित होत नाही. म्हणून आरोपणात जो उपरेपणा असतो, कलम करण्याचा प्रकार असतो तो इथे नाही. असाच प्रकार पुढील उदाहरणातसुद्धा आहे.

२) पावसाने ओथंबलेले सजल ढग बालकवींनी पाहिले आहेत तेच मुळात स्त्रीरूपात. एखाद्या स्त्रीची सजलता ढगात येते पण हे आपण नंतर म्हणतो. बालकवी ढगाकडे अशारीतीने पाहतात की त्यांना त्यातून स्त्रीत्वच अभिप्रेत असते.

३) आता तारका ही बालकवींना दिसते तीच मुळात एका मुग्ध बालिकेच्या रूपात. तंद्रितच हरवलेल्या मुग्धेच्या रूपात. या ठिकाणी काही अशी मुग्धा त्यांना ताराराणी मधून दाखवायची नाही की ताराराणीवर ते अशा मुग्धेचे आरोपण करीत नाहीत.

४) तसेच तारका आकाशात येताना मुळात स्त्रीरूपातच येतात. एकमेकांना खुणावत, काही सांगत.

५) 'चाफेकळी' बालकवींना मुळात दिसते ती काहीतरी शोधणारी आणि आजूबाजूच्या सृष्टीत गुंग झालेल्या बालिकेच्या रूपात.

६) 'औदुंबर' हा येतो तोच मुळी एका बालकाच्या रूपात ( रा. ग. जाधव ) किंवा जड सृष्टिपासून वैराग्य प्राप्त झालेल्या कलावंताच्या रूपात. ( दि. के. बेडेकर ) या ठिकाणी बालकवी कसल्याही प्रकारचे आरोपण करीत नाहीत. तर औदुंबर दिसतोच मुळी त्यांना अशा रूपात.

७) तृणपाते हेच मुळात देवदूताच्या रूपात बालकवी पाहतात.

८) फूल कसे तर जणूकाही उडत्या स्वर्गातील झुलणारे माणिकच.

वरील सर्व उदाहरणात उपमा देणे किंवा रूपक कल्पिणे किंवा भावभावनांचे आरोपण करणे हा प्रकारच नाही. बालकवींचे अवलोकन निसर्गाच्या आकलन क्षणी अशा प्रकारे रूपांतरित होत असते की, त्यांना ते मानवी रूपातच दिसते. बालकवींना फुलराणी दिसली म्हणजे काय झाले ? कुण्या बालिकेचे भावविश्व

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दिसले ? की, हे भावविश्व त्यांनी फुलराणीवर आरोपित केले ? की फुलराणी या भावविश्वाची वाहक आहे ? ही कविता वाचत असताना हे दोन्ही प्रश्न कसे निरर्थक आहेत हे लक्षात येते.

येथे आलेल्या उदाहरणात बालकवी निसर्गाचे आकलन स्त्रीरूपातच का करतात ? असा प्रश्न निर्माण होऊ शकतो. याचे उत्तर प्रा. द. भी. कुलकर्णी यांनी दिलेलेच आहे.

एकंदरीत त्यांच्या कवितेची धाटणी, प्रतिमांची निर्मिती आणि प्रतिमांचे संघटन अशा प्रकारचे असते की, भावनात्मक समानतेच्या पलीकडे कोठेतरी हा निसर्गच उपभोग्य होतो. आरोपण, उपमा, रुपक, वाहक इत्यादी प्रक्रिया त्यांच्या कवितेत अप्रस्तुतच आहेत हे उघड आहे. त्यांच्या कवितेतील निसर्गा-कलनाचे स्वरूप त्यांच्याच खालील दोन ओळीवरून स्पष्ट होईल –

सुंदरतेच्या सुमनावरचे दव चुंबुनी घ्यावे
चैतन्याच्या गोड कोवळ्या उन्हात हिंडावे.

टिपण २ : बालकवींच्या कवितेचा कथात्म घाट

बालकवींची कविता वाचत असताना जर कोणती गोष्ट लक्षात येत असेल तर तिची कथात्मकता. या ठिकाणी अनेक प्रश्न उपस्थित होऊ शकतात. या कथात्मकतेचे स्वरूप काय आहे ? ते कथाकाव्य आहे काय ? अशा प्रकारची कविता पूर्वी नव्हतीच का ? आणि जर या कवितेत कथात्मकता असेल तर ती काव्यात्मकतेला मारक ठरते का ? प्रथम कथात्मकता येते की, काव्यात्मकता येते ? की कथेलाच काव्यात्म रूप भेटते ? कथा वेगळी आणि काव्य वेगळे राहते का ? आणि सर्वच कवितांमधून ही कथात्मकता अवतरत नसतानाही कथात्म घाट असा शब्दप्रयोग केला आहे तो का ? अशा स्वरूपाचे अनेक प्रश्न येथे उपस्थित होऊ शकतात.

बालकवींच्या कथात्मघाटाचे विवेचन करण्यापूर्वी काही गोष्टी स्पष्ट करणे आवश्यक आहे. त्या म्हणजे बालकवींची कविता म्हणजे कथाकाव्य नव्हे. कथाकाव्यामध्ये येणारी कविता ही कथा या घटकाची वाहक असते. आणि त्यामुळे तेथील कवितेला काव्यात्म अंग प्राप्त होईलच असेही नाही. त्या ठिकाणी महत्व असते कथेला. तसेच पुढे ज्या कवितांचा उल्लेख येणार आहे. त्या कविता रूपक कविता आहेत काय ? असाही प्रश्न उपस्थित होऊ शकतो. नव्हे; तसा उपस्थित केला गेला आहे. प्रकाश कामतीकरांच्या "स्वप्नगंधेच्या" प्रस्तावनेत

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. नरहर कुरुंदकर म्हणतात "ही कविता वाचत असताना माझी संवेदनक्षमता वाढत नसून असलेली संवेदनक्षमता बोथट होत आहे असे वाटते. एकदा उषा ही गोपिका ठरली की, सगळेच संपले. मग गोपिका, कुंजवन, मुरलीधर, त्याची मधुर मुरली या सगळ्या क्षेत्राकडे आपण जातो व या प्रयत्नांत उषेचा सगळा साजशृंगार व उल्हास मावळतो." अशा प्रकारचे विवेचन प्रा. कुरुंदकर करतात आणि ही कविता रूपक कविता आहे असे सुचवतात. अर्थात्, रोमॅंटिसीझम संबंधीची त्यांची मते अन्यायकारक थोडीशी personal आहेत असे सांगून मोकळेही होतात. ही कविता रूपक कविता आहे. असा उल्लेख प्रा. गंगाधर गाडगीळ यांनी "साहित्याचे मानदंड" या ग्रंथात केल्याचे आठवते.

तेव्हा महत्त्वाचा प्रश्न तो हा की, बालकवींची कविता ही रूपक कविता आहे काय? रूपक कवितेत एकदा सूत्र सांपडले की, कविता संपते. जसे कुसुमाग्रजांनीची "आगगाडी आणि जमीन" ही कविता. आगगाडी कोण? जमीन कोण? तर शोषक आणि शोषित या दोन भूमिका एकदा लक्षात आल्या की, कवितेतील स्वारस्य संपते. तसे येथे होते का? खऱ्या अर्थाने बालकवींची "फुलराणी" ही जरी वधु असली तरी ती तेवढ्यापुरतीच मर्यादित राहते. कां? का तिच्या आशयाच्या, संवेदनांच्या; कक्षा विस्तारत जातात? उषा ही फक्त गोपिकाच ठरते का? का त्यापेक्षा अधिक काही? आणि जर "फुलराणी" काय? किंवा "उषा" काय किंवा "फुलपाखरू फुलवेली" काय या नुसत्या लौकिक मर्यादित अर्थाने जर काही भूमिका पार पाडत असतील किंवा बालकवी पार पाडावयास लावत असतील तर त्या कविता कधीच संपल्या असत्या परंतु त्या कविता आणखी आपण वाचतो आणि गुंगतो याचा अर्थच असा आहे की, त्यांना ऐतिहासिक महत्त्व नसून एक अक्षरमूल्य प्राप्त झाले आहे. आणि हे तेव्हाच घडू शकते जेव्हा त्या निव्वळ रूपक कविता ठरत नाहीत किंवा कथाकाव्य ठरत नाहीत.

मराठी कवितेमध्ये बालकवींच्या रूपाने प्रथमच कथात्म असा घाट आलेला आहे. बालकवींची "फुलराणी" किंवा "फुलपांखरू फुलवेली" किंवा "कविबाळे" ह्या कविता काय आणि अशा प्रकारच्या त्यांच्या इतर कविता वाचत असताना आपल्या मनात निश्चित असा एक कथेचा घाट जाणवत रहातो. एक प्रकारची कथाच आपण अनुभवीत आहोत असा प्रत्यय रसिकाला येऊ लागतो. "संध्यारजनी" या कवितेमध्ये संध्याकाळपासून ते दुसऱ्या

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दिवशी सकाळपर्यंत संपूर्ण काळ वातावरणासह उभा राहील याची काळजी बालकवी घेतात. पण हा काळ साकार होत असताना नुसता काळ साकार होत नाही तर येथे वावरणाऱ्या प्रत्येक घटकाला एक व्यक्तिमत्त्व प्राप्त होते. "पश्चिमा" ही पश्चिम दिशा रहात नाही तर सूर्याच्या प्रेमात पडलेली चिंतनमग्ना आहे, असे लक्षात येते. "तारका" या आकाशात नुसत्या लुक-लुकणाऱ्या तारका रहात नाहीत तर एकमेकांना खुणावणाऱ्या अशा बालिकाच होतात. त्यांचे लुकलूकणे म्हणजे जणू नाजुकपणे खुणावणेच. आणि त्यांचे आगमनसुद्धा कसे तर एकएक जणी येत आहेत. आकाशातील चंद्र तारकांचा सखा होऊन येतो. सूर्य संध्येचा प्रियकर होऊन येतो. अशा प्रकारे बालकवींच्या कवितेत वावरणाऱ्या प्रत्येक घटकाला एक विशिष्ट असे व्यक्तिमत्त्व प्राप्त होते. एवढे नव्हे तरच त्यातून एक कथासूत्र साकारू लागते.

आता "कविबाळे" ही कविता जर आपण बघितली तर असे लक्षात येईल की, कवि बाळांचे एक विशिष्ट असे व्यक्तिमत्त्व साकारण्याचा प्रयत्न कवि करतो. त्याप्रमाणेच कवी बाळांचा उज्वलाकडून अंधारापर्यंतचा प्रवासही चित्रित होतो. प्रभुरायाची ही लाडकी लेकरे शांतीचा पावा वाजवताहेत सूर्य किरणांपासून बनवलेले बीन वाजवताहेत. परंतु कविबाळांच्या जीवनालाच येथून एक वेगळे वळण मिळालेले दिसते. आणि कथारूप घेऊ लागते.

"परि हाय कुठुनितरि आला। अति तीव्र विषारी वारा"

येथून या कवि बाळांना, 'मग भयद काळ डोहात।

—भोवंडूनि गिरक्या खाती' अशी अवस्था प्राप्त होते. नियतीचा स्पर्श जाणवतो. "फुलपाखरु फुलवेली" या कवितेत तर उत्कट अशा संवादाच्या साह्याने एका कलिकेचे आणि फुलपाखराचे प्रेम साकार केले आहे.

असाच प्रकार "तारकांचे गाणे," "पाखरास" "पारवा" "तू तर चाफेकळी" "निर्झरास" या कविताच्या मधून बघावयास मिळतो. अर्थात या कथा जरी आपल्यापुढे साकार होत असल्या तरी त्यात काव्य कशा प्रकारे अवतरते हेही पाहिले पाहिजे.

त्या अगोदर एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे की, "फुलराणी," "निर्झरास" "संध्यारजनी" "तारकांचे गाणे" "पाखरा" "पारवा" "कविबाळे" "तू तर चाफेकळी" इत्यादी बालकवींच्या कवितामधून पूर्ण कथा जशी साकार होते तशी पूर्ण कथा इतर कांही कवितांच्या मधून साकार

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

होत नसली तरी कांही कथात्म रेषा त्या कवितांमध्ये आहेत हेही आपल्या लक्षात येते. उदा. "औदुंबर" "खेड्यातील रात्र" "बालविहग" "अप्सरांचे गाणे" इत्यादी. कविता लिहिता लिहिता बालकवी सहज कांही व्यक्तिरेखा फुलवून टाकतात. एक विशिष्ट वातावरण चित्रित करतात की, अशा कवितांच्या मधूनही कथेच्या कांही घटकांची जाणीव व्हावी. "श्रावण मास" मधील एकंदरीत जे वर्णन येते ते पूर्ण वातावरणाला साकारीत, आणि तरीही एखाद्या क्षणचित्र टिपणाऱ्या कथेसारखे.

याच ठिकाणी बालकवींच्या वेगळ्या प्रकारच्या कवितांचा विचार केला पाहिजे त्या म्हणजे "दौलतरावांची मंजुळा" "मोहिनी" "वीर मराठा" "मराठा गडी" इत्यादी कवितांच्या मधून स्थूल स्वरूपाची कथा येतेच. मग या कविता आणि मी वर निर्देशिलेल्या कविता यात फरक काय आहे? (त्यांना एक दीर्घकाव्य लिहावयाचे होते आणि त्याचे हे सुटे सुटे भाग आहेत असे गृहीत धरूनही) हा प्रश्न आपण सोडवला की, बालकवीच्या कवितेचा कथात्मघाट कसा होता हे स्पष्ट होईल. या कवितांमधून बालकवींना एक विशिष्ट अशी कथा सांगावयाची आहे. या ठिकाणचे प्रयोजनच मुळी कथा सांगणे आहे. त्या निमित्ताने काही ओळीच काव्यात्म उतरतात.

"दौलतरावांची मंजुळा" या कवितेत मंजुळेच्या जीवनाचा प्रवास येतो. तो प्रयोजन होऊनच. म्हणून कवितेचे उद्दिष्टच कथा सांगणे हे बनते. परंतु आपण वर ज्या कवितांचा उल्लेख केला आहे. त्या कवितांचा उद्देश कांही कथा सांगणे नाही हे स्पष्ट होते. त्या ठिकाणी कथात्मकता आपोआप अवतरते. आपोआप कथात्मकता अवतरणे आणि कथा सांगणे यांत फार मोठे अंतर आहे. "फुलराणी" आणि "रवीकर" यांचे सुप्रभातीचे मीलन ही बालकवींची अनुभूती. ही अनुभूती साकारत असताना संध्याकाळपासून ते सकाळपर्यंतचा प्रवास येतो. येणाऱ्या प्रत्येक घटकाला व्यक्तिमत्त्व प्राप्त होत जाते. एक विशिष्ट वातावरण साकारत जाते. आणि कथात्मकता रूप घेऊ लागते. किंवा "पाखरास" या कवितेमध्ये कलावंताचे दुःख ही अनुभूती "पाखरास" मधून साकार होत असताना पूर्ण कथा येते. तेव्हा या ठिकाणी अनुभूती साकारण्यासाठी अवतरणारी कथात्मकता ही गौण स्वरुपाची असते काय? हा एक प्रश्न. तर तसेही जाणवत नाही. कथा पूर्णपणे कथा म्हणून अस्वाद्यच रहाते. आणि तिला काव्यात्म मूल्यही प्राप्त होते. म्हणजे एकाच [illegible]लकवी आपली अनुभूती साकारण्यासाठी कथात्मकतेचा आणि काव्या-

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्मकतेचा उपयोग करून घेत आहेत. तरीही परिणामकारकतेच्या एकतेत मुळीच कमतरता निर्माण होत नाही. हेच त्यांचे सामर्थ्य होय. या ठिकाणी बालकवींच्या कथेवर आपले लक्ष केंद्रित होत नाही असे, वा. ल. कुलकर्णी म्हणतात. (टीपा आणि टिप्पणी) परंतु अनुभव उलट येतो. कथात्मकतेवरती लक्ष केंद्रित होतेच. परंतु त्याच वेळी आपण काही काव्यात्म अनुभवही घेत आहोत हेही सतत जाणवत रहाते. आणि म्हणूनच ही रुपक कविता होत नाही. बालकवींची कविता वाचतांना कथेस पूरक अशा घटना जशा आपण एकीकडे पहात जातो त्याप्रमाणेच ही कविता तीव्र संवेदना जागृती करणारी आणि संवेदनाचा उपभोग देणारी आहे, याचा अनुभव येतो. आणि तेही अतिशय सूचकतेने "शांतीचा करुनि पावा। अवकाशी सूर भरावा" —या ठिकाणी तर आपण निःशब्दाच्या गीतात बुडून जातो. हे निःशब्दाचे गीत जाणवते फक्त अंतःकरणाला. हे जाणवत असतानाच वारा का येतो ? असा प्रश्न मनात उद्‌भवून कवितेला एक नियतीचे परिमाण प्राप्त होते आणि कथात्म होण्यास मदत होते. परंतु वाऱ्याचे येणे इतके काव्यात्म असते की ते काव्यात्म पातळीवरुनच अस्ताद्य होते.

"परि हाय ! कुठूनि तरी आला। अति तीव्र विषारी वारा। कंपित हो एका एकी। मधु दिव्य देश तो सारा।' अशा प्रकारे आपल्या संवेदना जागवल्या जातात. आणि संपूर्ण कवितेमधून सूचित होणारा कलावंताचा प्रवास ("पाखरास" मध्ये कलावंताचे दुःख) पाहिला म्हणजे ही कविता किती सूचक आहे हे लक्षात येईल. आणि याच ठिकाणी बालकवींची कविता ही अतिशय काव्यात्म बनते. कथात्म असून सुद्धा. मागेच म्हटल्याप्रमाणे ही कविता कथात्म आणि काव्यात्म एकाचवेळी आहे. अर्थात् कथेला काव्य पूरक का काव्याला कथा ? असे प्रश्नच या ठिकाणी उपस्थित होऊ शकत नाहींत. तसेच कथा या घटकामुळे काव्यात्मकतेस बाध येतो किंवा काव्यात्मकतेमुळे कथा खंडित होते असेही जाणवत नाही. एकंदरीत कथात्मकता आणि काव्यात्मकता या दोन्ही घटकांचा उपयोग बालकवी अतिशय कौशल्याने अनुभूती साकारत असताना करतात. म्हणूनच परिणामाची एकता साधल्या जाऊनही कथात्मकतेचा आणि काव्यात्मकतेचा एकाच वेळेस प्रत्यय येतो.

### टिपण ३ रे : बालकवींच्या 'अपूर्ण' कविता

बालकवींच्या अगदी प्राथमिक अवस्थेतील कविता वगळल्या तर त्यांच्या कवितांची संख्या साधारणतः १४० येवढी भरेल. बालकवींच्या १४० कवितां-



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पैकी जवळ जवळ ३५ कविता ह्या अपूर्ण राहिलेल्या आहेत असे आपल्या लक्षात येईल. म्हणजे एकंदरीत काव्यसंभारापैकी $\frac{1}{3}$ भाग अपूर्ण कवितांचा आहे. त्यातील " प्रतापसिंग ", " दौलतरावांची मंजुळा ", " शाहीर ", ' वीर मराठा ', ' वीरगडी ', ' निश्वास ', इत्यादी कविता ह्या प्रामुख्याने एका दीर्घ काव्याचे तुकडे आहेत. असे सांगितले जाते तेव्हा ह्या कविता अपूर्ण असल्यास नवल नाही. तसेच दीर्घ काव्यात असे घडण्याची शक्यता असते.

तसेच ' राष्ट्रसेवा ', ' आर्यांची अवनती ', ' नीती व अनीती ' -इत्यादी कविता ह्या वाङ्मय बाह्य प्रयोजनातूनच लिहिल्यामुळे त्यांच्या अपूर्णत्वाची चर्चा करण्याचेही कांही कारण नाही. परंतु वरील कविता वगळता अंदाजे पंचवीस तरी कविता ' अपूर्ण ' आहेत असे बालकवींनी लिहून ठेवलेले आहे. तेव्हा बालकवी जरी ह्या कविता ' अपूर्ण ' आहेत असे म्हणत असले तरी ह्या कविता खरोखरच अपूर्ण आहेत काय ? असा एक प्रश्न त्यांच्या अपूर्ण कवितांकडे बघून आपल्या मनात निर्माण होतो.

एखाद्या वेळी काही लौकिक अडथळयांच्या मुळे काव्यलेखन थांबू शकते आणि एखादा कवी त्या विशिष्ट अशा भाववृत्तीतून बाहेर आल्यानंतर त्यात त्याला पुन्हा प्रवेश घेता येईलच असेही काही सांगता येत नाही. इंग्रजी मधील कांही कवींची अशी उदाहरणे प्रसिद्धच आहेत.[१] कविता लिहिता लिहिता एखादा मित्र आला आणि काव्यलेखन थांबले पुन्हा ती कविता पूर्ण करता आलीच नाही. परंतु अशा प्रकारचे लौकिक अडथळे एखाद्या दुसऱ्या कवितेलाच येऊ शकतात. एकंदरीत काव्यसंभारापैकी तेवीस, चोवीस कविता अपुऱ्या राहतात तेव्हा त्याला अशीच कारणे घडलेली असतात असे म्हणणे बरोबर होणार नाही. जर लौकिक अडथळयांनी कविता अपूर्ण राहिली तर ती कविता अपूर्ण वाटते. परंतु बालकवींच्या ' अपूर्ण ' कविता ह्या अपूर्ण वाटतच नाहीत तर बालकवींनी त्या लिहिता लिहिता तशाच ठेवल्या असाव्यात असे वाटते आणि हीच शक्यता अधिक संभवते. जर अशा अपूर्ण ठेवलेल्या असतील तर का ठेवल्या असतील ? असा प्रश्न निर्माण होतो

साधारणतः या संपूर्ण कविता बालकवींच्या उत्तर कालातील आहेत. एखादा कवी लिहित लिहित जातो आणि एकदम थांबतो याचा अर्थ काय ? आणि हे एका कवितेच्या बाबतीत घडत नाही तर २४, २५ कवितांच्या बाबतीत ?

---

१. कोलरीजची कविता ' कुब्लाखान ' उदाहरणा दाखल पहावी.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बालकवींच्या कविता बघत असताना एक गोष्ट आपण लक्षात घेतली पाहिजे ती ही की, ह्या कविता बालकवींना जरी अपूर्ण वाटत असल्या तरी वस्तुतः त्या पूर्णच आहेत. अशी प्रतीती रसिकांना येते. एखादी कविता जरी एखाद्या कवीला अपूर्ण वाटत असली तरी ती रसिकांना पूर्ण वाटू शकते. कलाकृती कडून कलावंताकडे जाणे हीच वाङमय अभ्यासाची बहुसंख्यांनी मान्य केलेली पद्धती होय. म्हणून बालकवींना अपूर्ण वाटणाऱ्या कविता त्यांच्या प्रकृतीवरुन पूर्ण आहेत असे रसिकांना वाटते. कलावंत लिहिता लिहिता थांबतो आणि कलाकृतीला पूर्णत्व आलेले असते. त्या ठिकाणी थाला थांबणेच योग्य वाटते. त्याचा अनुभव वस्तुतः पूर्ण झाल्याचीच शक्यता अधिक असते. (अर्थात हा काही नियम नाही.) एखादी कलाकृती रसिकाला परिपूर्ण वाटते म्हणजे एक सुसंगत अनुभव अनुभवल्याचा प्रत्यय येतो. परंतु कलावंताला मात्र असे वाटत असेल की, आपण एक अनुभव व्यक्त करू शकलो नाही, तर त्या ठिकाणी कोणती प्रक्रिया घडते ?

कविता लिहिताना एखादा कवी थांबतो तेव्हा त्याचा अनुभव परिपूर्ण झालेला असण्याची शक्यताच अधिक असते असे वर म्हटले आहे. तेव्हा ती कवीला अपूर्ण वाटते ते का ? असा एक प्रतिप्रश्नही निर्माण होतो. तर कला निर्मितीच्या क्षणाव्यतिरिक्त तो कलावंत एक लौकिक व्यक्ति असण्याची शक्यता जशी आहे तसेच तो जागृत समीक्षक असण्याचीही शक्यता आहे. ( या ठिकाणी समीक्षक म्हणजे कलाकृतीकडे अलिप्ततेने बघणारा ) तेव्हा बालकवींना ह्या कविता लिहिता लिहिता थांबावे लागले. त्या क्षणीच त्यांची निर्मिति-प्रक्रिया संपली. आणि ते एका अपर विश्वातून लौकिक विश्वात आले. लौकिकाची बंधने त्यांना चिकटली तेव्हा त्या लौकिक बालकवींना किंवा त्यांच्यातील समीक्षकत्व ( असलेच तर ) ती कविता अपूर्ण आहे असे वाटण्याचीच शक्यता अधिक.

अर्थात हा काही जर तर चा खेळ नव्हे तर सर्व शक्यता अशक्यता आज ताडून पाहिल्या तर ह्या अपूर्ण कवितांपैकी एक दोन सोडल्या तर बाकीच्या परिपूर्ण वाटतात. एका अनुभवाची परिपूर्ण अभिव्यक्ती झालेली आहे याची जाणीव होते प्रत्येक कविता एका अपरिहार्य क्षणीच थांबते याचा प्रत्यय येतो. कवितेची सुरुवात आणि अपरिहार्य शेवट ह्यामध्ये एक अनुभवाचे वर्तुळ असते. आणि हे वर्तुळ संपले की एक अनुभवाचे परिपूर्ण स्वरुप प्रत्ययाला आले याची जाणीव होते. आपण उदाहरणादाखल म्हणून 'पाऊस' ही कविता घेऊ.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आकाशात मेघांच्या राशी सजलतेने थबथबलेल्या आहेत त्यांचे चित्र-विचित्र रंग पाहून कोणीही मोहरून जाईल—अशा प्रकारचे चित्र बालकवी उभे करतात. त्यांचे रंग, आणि एकाएकी आलेले हे सजल ढग यांचे वर्णन झाल्यानंतर वाऱ्याचे आगमन बालकवी सूचित करतात. कोणी नाही, असे बघून वारा त्यांना अस्ताव्यस्त करतो. असा साधारणत: गद्य सारांश परंतु कविता येवढ्यावर थांबत नाही. ''

'' थबथबली ओथंबुनी खाली आली। जलदाली मज दिसली सायंकाळी '' असे म्हटल्याबरोबर थबथबणाऱ्या जलदांचे दृश्य आपली नेत्रसंवेदना तृप्त करते. आणि म्हणूनच ही कविता वरील सारांशापुरती मर्यादित नाही. किंबहुना ती तशी नाही म्हणूनच कविता आहे. या ठिकाणी असलेली अंतरलय, ढगांचे थबथबलेपण, ओथंबणे आणि खाली येणे साकार करते. परंतु आपला खरा प्रश्न असा की ही कविता अपूर्ण कशी ?

थबथबली, ओथंबुनि खाली आली
जलदाली, मज दिसली सायंकाली

या ओळीने सुरुवात होणारी कविता—

पाहुनि ते मग मारुत शिरतो तेथे
न्याहळूनी नाही बघत दुसरे कोणी
मग हाते अस्ता व्यस्त करी त्याते
मधुमोती भूवरती भरभर ओती

- या ओळींनी थांबते. पावसांनी थबथबलेल्या ढगापासून सुरुवात होऊन '' मधुमोती भूवरती भरभर ओती '' या ठिकाणी ही कविता थांबते. एक अनुभवाचे पूर्णत्व पूर्ण झाले आहे हे लक्षात येते. ढग आले आणि पाऊस पडला म्हणून हे पूर्णत्व नव्हे हे मात्र लक्षात घेतले पाहिजे. परंतु जलद येतात आणि कोसळतात यामध्ये बालकवी जे सुसंगत नाते प्रस्थापित करतात त्यामध्येच अनुभवाचे वर्तुळ पूर्ण झाले आहे असे वाटते. येथे बालकवी थांबले ते अपरिहार्यपणेच कारण बालकवी काही उत्प्रेक्षण करणारे कवी नव्हेत. कदाचित त्या Mood मध्ये कवीला पुन्हा शिरताही येणार नाही परंतु त्या Mood मध्ये शिरून तरी अधिक काय साधले असते ? असे वाटते. जशी फुलराणी एका विविक्षित ठिकाणी थांबते, नाट्याच्या परिणत अवस्थेत थांबते, एक अनुभव-विश्व परिपूर्ण झाल्यानंतरच थांबते तसेच याही ठिकाणी होताना दिसते. ( या कवितेचे अधिक विश्लेषण पुढील टिपणात आहेच. )

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दुसरे आणखी एक उदाहरण घेऊ म्हणजे हा मुद्दा अधिक स्पष्ट होईल 'तू तर चाफेकळी' ही कविता –

"गर्द सभोती रान साजणी तू तर चाफेकळी।
काय हरवले काय शोधिशी या यमुनेच्या जळी ?"

या ओळींनी सुरुवात होते. या चाफेकळीशी संवाद करणारा तिला प्रश्न करतो, आणि ती म्हणते, ह्या जललहरी हेच माझे घर आहे, हरिणी, मैना हे सर्व तिला आवडतात, आणि ती त्याना आवडते. पुन्हा हा संपादक म्हणतो, "तुला रात्रीचे वनदेव भुलतील, तू या भुवनात एकुलती एक सुंदरी आहेस आणि शेवटी सांगतो की मी तुझ्यावर भुललो आहे माझ्या घरी चल."

"सांज सकाळी हिमवंतीचे सुंदर मोती घडे,
हात लाविता परिनाथा ते तर खाली पडे"

किती सूचकतेने तिने त्या संपादकाचे म्हणणे डावलले आहे. त्याला त्याच्या विश्वाची जाणीव करून दिली आहे, आणि आपण त्याच्या विश्वात राहूच शकत नाही. असे दवबिंदूंच्या साह्याने ती पटवून देते.

वस्तुतः या ठिकाणी नरनाथाचे संवादच संपलेले आहेत आणि तिलाही कांही सांगायचे असे राहिलेले नाही. असे आपणास ही कविता वाचल्यावर जाणवते. एक पूर्णत्वाचे वर्तुळ पूर्ण झालेले आहे असे जाणवते. आणि तरीही ही कविता बालकवींना अपूर्ण वाटते. मात्र रसिकांना ती पूर्णच वाटते.

तसेच त्यांच्या इतर अपूर्ण कवितांच्या संदर्भातही म्हणता येईल. 'प्रीती आणि कर्तव्य' या कवितेमध्ये प्रीतीच्या भयाकुल पथावरून जात असता प्रीती काही मिळत नाही. आणि म्हणून "त्या योगे परि जीव हा निशिदिनी ठेचाळतो सारखा." या ठिकाणीच अपरिहार्यपणे कविता थांबते. अनुभवाचे एक वर्तुळ पूर्ण झालेले आहे हे जाणवते. 'भटकणे," मध्ये 'तिच्या' मागे निघालेला 'तो ('ती' म्हणजे 'प्रेयसी' अथवा 'कविता') 'परि अजुनि तू दूर किती वर पथ दुःखद वाटतो.' या ओळीवर कविता अपरिहार्यपणे थांबते. 'पारवा' ह्या त्यांच्या सुप्रसिद्ध कवितेच्या संदर्भातही आपणास हेच म्हणता येईल. उध्वस्त धर्मशाळेच्या कौलारी बसून गाणारा पारवा हा उध्वस्ततेचे प्रतीक होऊन येतो. आणि तोही दुःखनिद्रेत आहे. त्याचे जग हे दुःख निद्रेत आहे. परंतु माझ्या जगातल्या उष्ण वाऱ्यांचे मात्र तुला भान नाही असे कवी म्हणतो आणि कविता अपरिहार्यपणेच थांबली आहे याची जाणीव रसिकांना होते याचप्रमाणे 'निराशा'

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'कवीची इच्छा' 'मूढमालती' 'हृदयाची गुंतागुंत' 'थडग्यातील रमणी' 'रजनीस आवाहन', 'गाण्याची चढली कमान' 'संशय', 'दवबिंदू' इत्यादी कवितांच्या संदर्भातही ह्या कविता पूर्णच आहेत तसे जाणवते. कांहीना कांही कारणाने बालकवींप्रमाणेच आपणासही अपूर्ण वाटणाऱ्या कविता दोन तीन निघतील. उदा:–'शून्य मनाचा घुमट', 'अश्रुमाळ' 'मेघांचा कापूस' इत्यादी ह्या अपवादभूत कविता होत.'

आता शेवटी एक प्रश्न उपस्थित होतो की, आयुष्याच्या उत्तरार्धातल्याच कविता त्यांना अपूर्ण कां वाटतात ? हा कलावंताच्या दृष्टीने प्रश्न ( रसिकांच्या दृष्टीने, वरील विवेचन आहेच ), ह्या प्रश्नाचे उत्तर देणे मात्र कठीण आहे.

आपण काही एक अंदाज बांधू शकतो. अर्थात हा अंदाजच. शेवटच्या शेवटच्या काळात त्यांच्यातला समीक्षक तर अधिक जागा नसेल; ( समीक्षा आणि कलानिर्मिती ह्या दोन एकत्र राहू शकतात हे अनेकांनी सिद्ध केले आहे. ) लक्ष्मीबाई टिळकांच्या संबंधी आपण म्हणतो की त्यांना Literary form's ची माहिती असती तर त्यांच्या हातून एवढा उत्कृष्ट ग्रंथ न निपजता ! बाल कवी शेवटी शेवटी काही लौकिक कारणांमुळे अधिक सजग ( कवितेच्या संदर्भात ) तर झाले नसावेत ? नुसते गावे ही वृत्ती पूर्वी होती तशी शेवटी न राहून लिहिण्यासंबंधी काही कल्पना निश्चित होत गेल्या परंतु मूळ प्रकृती काही सुटेना. म्हणून तर त्यांना त्या कविता अपूर्ण वाटताहेत ? या जाणिवामधूनच त्यांनी 'धर्मवीर' 'नीति आणि अनीति' लिहिली. तेव्हा हे त्यांना का लिहावे वाटले मूळ प्रकृती सोडून ? तसाच तर काही प्रकार नाही ? अर्थात हे नुसते अंदाज !

## टिपण ४ थे : बालकवींच्या कवितेतील लयास्वाद

"Drawing is nothing but enjoying rythem" अशा अर्थाचे एक विधान चित्रकलेच्या संदर्भात बऱ्याच वेळा वापरण्यात येते. अर्थात कला आणि लय आता अविभाज्य किंबहुना लय ही आशयानुसारी असतेच असते याबद्दल कोणालाच संदेह असण्याचे कारण नाही. सर्वकलांच्यामध्ये असलेला लय हा घटक साहित्यातही आहे, हे उघड आहे. तेव्हा कुठल्यातरी, कोणाच्यातरी, कवितेत लय आहे. ती अपरिहार्य आहे या विधानाला फारसा अर्थ उरत नाही. किंबहुना असे म्हणणे वेडगळपणाचेही ठरू शकेल. पु. शि. रेगे काय किंवा अनिल काय किंवा मर्ढेकर, चित्रे, सुर्वे, काय यांच्या कवितेत लय

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असते असे विधान बरेच विनोदी ठरण्याचा संभव आहे आणि म्हणून त्या त्या कवितेतील लयीचे स्वरुप कसे आहे आणि ही लय आशयानुसारी कशी आहे यातच कवितेचा खरा अभ्यास आहे. अर्थात कोणत्याही कवितेतील लयीचा आस्वाद घेताना आपल्या मनावरती त्या कवितेचे जे संस्कार होतात त्यावरूनच ठरवायचे. तसेच या ठिकाणी मी बालकवींच्या एकंदरीत कविता वाचत असताना ही लय कोणत्या स्वरुपाची आहे, हे संवाद लय, विरोध लय, समतोल लय अशी तांत्रिक भाषा न वापरता विवेचन करणार आहे. त्यासाठी बाल कवींची " पाऊस " ही कविता पाहू.

" थबथबली ओथंबुनि खाली आली
जलदाली मज दिसली सायंकाली
रंगहि ते नच येती वर्णायाते !
सुंदरता मम त्यांची भुलवी चित्ता
व्योमपटी जलदांची झाली दाटी;
कृष्ण कुणी काजळीच्या शिखरावाणी
नील कुणी इंद्रमण्यांच्या कान्तिहुनि
गोकर्णी निश्र जांभळे तसे कुणी
तेजात धूमाचे उठती झोत
चमचमती पांडुरही त्या परिस किती !
जणु ठेवी माल भरुन वर्षा देवी
आणुनिया दिगंतराहुनि या ठाया
कोठारी या वरला दिसतो नपरी
पाहुनि ते मग मारुत शिरतो तेथे;
न्याहळुनी नाहि बघत दुसरे कोणी
मग हाते अस्ताव्यस्त करी त्याते
मधुमोती भूवरती भरभर ओती !

आता ही कविता बघत असताना, प्रथम जर कांही जाणवत असेल तर ते म्हणजे या कवितेतील प्रत्येक ओळीचे दोन तुकडे आहेत. साधारणतः पहिल्या तुकड्यात सहा मात्रा, आणि दुसऱ्या तुकड्यात १३ मात्रा येतात परंतु या दोन तुकड्यामध्ये आणखी कांही वैशिष्ट्ये आहेत ती म्हणजे पहिल्या घटकामध्ये आणि दुसऱ्या घटकांमध्ये साधलेले यमक या ठिकाणी स्वाभाविकपणे यमकामुळे आपण थांबतो वस्तुतः सहा मात्रा आणि तेरा मात्रा असलेल्या या दोन



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

घटकामध्ये यमक साधणे आणि शेवटपर्यंत तो तसाच ठेवणे हे एक कठीण कार्य परंतु एका " ओथंबलेल्या " मनःस्थितीत ते आपोआप साधले आहे. आणि पहिल्या घटकातील शेवटच्या विराम स्थानामुळे ही कविता अधिक भारदस्त, डौलदार होते हे नाकारता येत नाही.

त्याचप्रमाणे अक्षरांच्या पुनरावृत्तीमुळे या कवितेला एक बाह्य सौंदर्य आणि बाह्य लय प्राप्त होते. उदा.

" थबथबली ओथंबुनि खाली आली
जलदाली मज दिसली सायंकाली "

पहिल्या आणि दुसऱ्या ओळीमध्ये " थ ", " ब ", " ली " आणि " थं " व " यं " वरील न् घोषित करणारा अनुस्वार यांची पुनरावृत्ती होते. एकंदरीत अंत्य यमक आणि पुनरावृत्ती यामुळे या कवितेला एक प्रकारची बाह्य लय प्राप्त होऊन कवितेचा घाट निश्चित होत जातो. तसेच एका विशिष्ट ठिकाणी थांबत थांबत पुढे जाताना आपण पुढे एका विशिष्ट ठिकाणी थांबतो उदा. 'थबथबली' या एकाक्षरी ओळीमधील शेवटच्या 'ली' वरती आपण थांबतो. नंतर 'ओथंबुनी खाली आली' यातील शेवटच्या 'ली' वरती आपण थोडा अधिक वेळ कायमचे थांबतो. ( पहिल्या 'ली' च्या तुलनेत ) पहिल्या 'ली' च्या पुढे आपण थांबतो परंतु पुढे कांहीतरी आहे हे येथील 'ली' सूचित करते. ह्या 'ली' वर थांबण्याचा वेळ हा शेवटच्या 'ली' वर थांबण्याच्या वेळापेक्षा कमी आहे. अशा प्रकारे आपण थांबत थांबत पुढे जातो आणि थांबतो. यामधून एक प्रकारची तालबद्धता साकारत जाते आणि या कवितेत कांही ठिकाणी नादमयता असल्याची जाणीव होते तेव्हा अंत्य यमक, अनुप्रास, नाद, ताल, यती यामधून ज्याप्रमाणे बाह्य लयीची जाणीव होते त्याचप्रमाणे कवितेतील अंतरलयीचे स्वरुप लक्षात येते.

आणखी एक गोष्ट आपल्या लक्षात येईल की, कवितेतील ओळीमधील प्रथम घटकानंतर आपण थांबतो आणि द्वितीय घटकानंतरही थांबतो. ते या अंत्य यमकामुळेच नाही तर अर्थच्छदेचे एक वर्तुळही पूर्ण झालेले असते म्हणून ! अशा प्रकारे, आपण थांबत असलो आणि पुनरावृत्तीमुळे हे थांबणे वाढत असले तरी 'या कवितेमध्ये एक प्रकारची गतिमानता आहे हेही प्रत्ययाला येते. मध्ये मध्ये आपण थांबत असतो आणि तरीही कविता गतिमान आहे. असे आपण म्हणतो तेव्हा त्यात विसंगती असल्याची शंका येते परंतु थांबता

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

थांबताच आपण गतिमान होत जातो किंबहुना या विरामस्थानांमुळेच गती प्राप्त होत जाते, असे आपल्या प्रत्ययास येते. आणि कवितेच्या शेवटीच ही परिपूर्णपणे गतिमानता स्थिरावलेली आहे. असेही आपल्या लक्षात येते. ही गतिमानता स्थिरावलेली आहे. असे आपल्या लक्षात येते तरीही परंतु या थांबण्यातूनच गतिमानता कशी साकारते ? तेव्हा ही विरामस्थाने आणि पुनरावृत्ती यामधुनचे थांबणे, एका प्रकारे बाह्यलय साकारत असतात आणि आशयाच्या गतिमानतेमुळेच आंतरलय साधली जाते हेही आपण जाणतो.

या ठिकाणी आपण एक लक्षात ठेवले पाहिजे की, बाह्य आणि आंतरलय ह्या काही वेगळ्या बाबी नव्हेत. तर एकमेकास पूरकच किंबहुना एका अनुभवआकृतीमधील दोन भाग.

आता "थबथबली". या शब्दाकडे बघत असताना "थब" या शब्दाच्या पुनरावृत्तीमुळे आणि "थबथबली" या सहा मात्रांवरच हा घटक थांबत असल्यामुळे जलदांचे सजलत्व साकार होते. थबथबणे साकार होते. पाण्याने भरलेल्या टच्चतेचे साकारणे या इथे थांबल्यामुळेच साकारू शकते. पुढे "ओथंबुनि खाली आली" या घटकांनी कविता सुरू होते. आणि "ओथंबुनी" या शब्दाचा "थबथबली" या शब्दाशी संबंध येतो. तो तो शब्द कवितेत आला आहे म्हणूनच नव्हे तर "थ" च्या पुनरावृत्तीमुळे आणि "थबथबणे" पूर्णत्वास नेण्यामुळे ! पुढे "खाली आली" या ठिकाणी आपण "आली" वरती थांबतो आणि 'थबथबली' मधील 'ली'. 'खाली आली' या दुसऱ्या घटकातील दोन 'ली' मुळे हे दोन घटक आन्तरिक दृष्ट्या बांधले जातात तसेच ओथंबल्यानंतर खाली येणे केवळ अपरिहार्यच ठरते. पुढे आपण "जलदाली" वरती थांबणे हे पाण्यानी भरलेल्या ढगाचे गच्चपण अधिकच साकारते. येथपर्यंत तीन ठिकाणी यती अपरिहार्यपणे आला आहे. या "यती" मुळे वर्ण्य अनुभवाच्या घटकांवर आपले लक्ष केंद्रित होते. आणि हे लक्ष एकदा केंद्रित झाले की, जलदांचे "थबथबणे" आणि "ओथंबणे" आपल्या मनात तरंगावयास लागते. त्याच्या गच्चपणासह, गच्चपणातील सजलत्वासह, सौंदर्यासह ! परंतु कवी पुढे लगेच स्थळ नोंदवतो.

"मज दिसली सायंकाळी" पुन्हा हा चवथा घटक "ज" "यं" "ली" या अक्षरामुळे पहिल्या तीन घटकांशी त्यांचे आन्तरिक नाते आपोआप प्रस्थापित होते. आणि पाण्याने टचटचलेले ढग "सायंकाळी" खाली आले त्यामुळे "सायंकाळ" आणि "मेघ" यामध्ये आपोआपच एक Relation प्रस्थापित


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

होते. कारण सायंकाळच्या एकंदर वातावरणांत या ढगांचे "थबथबले" पण अधिक गच्च दिसते; आणि म्हणूनच सायंकाळ येते. आन्तरिकदृष्टया ही लय आशयाला भरीव, अर्थपूर्ण करण्याचे कार्य करते. म्हणूनच यतिमध्येही गतिमानतेचे सामर्थ्य आहे. ही गतिमानता आशयाच्या "थबथबलेपणांतुनही निर्माण झाली आहे, हेही लक्षात घेतले पाहिजे. त्यामुळेच एक संपूर्ण दृष्य आपल्या डोळ्यासमोर साकारते.

आपण पुढे सरकतो आणि ढगांना विविध रंग प्राप्त होतात. "भुलवी चित्ता", "जलदांची झाली दाटी," काजळीच्या शिखरावाणी," "इंद्रमण्याच्या कांतीहूनि," मिश्र जांभळे कुणी तसे," या उल्लेखावरून आपण झरझर तरीही वर निर्देशिलेल्या यतिप्रमाणे थांबत थांबतच तरीही गतिमानतेने येतो आणि थांबतो ते 'तेजात धूमाचे उडती झोत. चमचमती पांडुरही त्या परिस किती" या ओळीपाशी.

वरील वर्णन एकीकडे जसे रंग निर्देश करते त्यापेक्षाही ढगांचे गच्चपण साकारीत असते. ढगांच्या गच्चपणातून आपण थबकतो. ते एकदम वरील "तेजात". या घटकातील "त" चा संबध पुढील घटकातील "त" आणि "ती" शी आहे. त्यामुळे या दोन घटकात नाते निर्माण होते. मग हे तेज नसून तेजाचे "झोत" आहेत हे लक्षात येते. हे तेजाचे झोत "धूमाचे" आहेत. या जलदांच्या भरगच्चपणावर धूमाचे झोत आपले विशिष्ट रंग मिसळतात; आणि पहिल्या दोन ओळीतील आशयाला एक कलाटणी मिळते. नुसते "थबथबलेले" ओथंबून खाली आलेले सायंकाळचे हे ढग रहात नाहीत किंवा नुसते विविधरंगी रहात नाहीत तर त्यावरती आता कसलेतरी तेज आहे. आणि धूमाचे झोत त्या तेजामधून "उठताहेत." या ठिकाणी "उठणे" हा शब्दही मोठा लक्षणीय आहे. निघती येती, फिरती, असे शब्द न येता 'उठती' हा शब्दच येतो. त्यामुळे त्या झोतांचे एकाकीपणे पसरणे साकार होते. कोठुनी येती, कोठे फिरती, कोठे निघती असे प्रश्न "उठती" या शब्दामुळे निर्माण होऊ शकत नाही. "उठणे" या शब्दाला बोली भाषेत जो अर्थ आहे तोच येथे आहे आणि त्यामुळे या तेजाच्या झोताचे आणि जलदांचे एक नाते निर्माण होते एक आंतरिक लय या दोघांच्यामध्ये येथपर्यंत निर्माण झालेली आहे असे आपल्या लक्षात येते.

बालकवी जो अनुभव साकारीत आहेत. त्याला या ठिकाणी वेगळे परिमाण प्राप्त होते. आंतरिक दृष्टया हे प्राप्त होणारे परिणाम अर्थात भरच घालतात. जलदांच्या वर्णनातील विकास किती अर्थपूर्ण वळण घेतो हेही लक्षात येते.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वरील दोन ओळींवरून आपण सरकतो आणि थबकतो ते एकदम —

“ पाहुनी ते मग मारुत शिरतो तेथे
न्याहळुनि नाही बघत दुसरे कोणी
मग हाते अस्ताव्यस्त करी त्याते
मधुमोती भूवरती भरभर ओती ”

— या शेवटच्या ओळींवरच. या ठिकाणी अनुभवाचे एक वर्तुळ परिपूर्ण झाल्याचा प्रत्यय येतो. प्रथम जलद हे “ जलदालीच्याच ” रूपात आपल्यापुढे येतात. आणि शेवटी येणारा वारा “ न्याहळुनि नाही बघत दुसरे कोणी ” बघून त्यांना अस्ताव्यस्त करतो. एकाप्रकारे सूक्ष्म शृंगार यातून व्यक्त होतो. वाऱ्याचे मेघांशी मीलन हे कवितेला वेगळे परिमाण प्राप्त करून देते. एवढेच नव्हे तर कवितेला पूर्णत्वही लाभलेले आहे असे दिसते. हे पूर्णत्व पहात असताना तिचा विकासक्रम आपल्या लक्षात येतो. तो हा या कवितेतील शेवटचा टप्पा आहे हे कळते.

मधल्या एका टप्प्यावरती आपण थांबलो होतो. आता शेवटच्या टप्प्यावर थांबलो. हा शेवटचा टप्पा प्रथम आलेल्या स्त्रीलिंगी ( जलदाली मज दिसली ) रूपाशी आंतरिकदृष्टचा संबंधित आहे हे लक्षात येते. कवितेचा विकास कसा कलात्मकरितीने पूर्ण झाला आहे हेही लक्षात येते.

वरील चारही ओळीत अक्षरपुनरावृत्ती आणि अंत्य यमक यामुळे जशी बाह्यलय साधली तशीच अंतरलय ही साधली आहे ती त्या आशयाच्या विकासामुळे किंवा आशयाला मिळालेल्या एका वेगळ्या परिणामामुळे

पहिल्या चरणघटकापासून यती ज्या ठिकाणी येतो त्याच ठिकाणी पुढेसुद्धा येतो त्यामुळे ही कविता अतिशय तालबद्ध होते. एका विशिष्ट बाह्यलयीमुळे ही कविता बांधली जाते तशीच आंतरिक बांधणीसुद्धा पक्की झाली आहे हे आपल्या लक्षात येते.

असे जरी असले तरी आशयाच्या विविध टप्प्यावर थांबत थांबत पुढे जाताना एका विशिष्ट लयीशी आपण एकरूप होतो हे आपल्या लक्षात येते. ही आशयातील लय आहे.

कविता जेव्हा आपल्या मनात सुरू होते तेव्हा लयीचे महत्व आणखीनच जाणवते. ज्या आशयातूनच या लयीने जन्म घेतला आहे किंबहुना ज्या लयीत ही कविता आहे त्यामुळेच या कवितेला वेगळे परिमाण प्राप्त होते असे आपल्या लक्षात येते. म्हणून आंतरिक लय ही अशी आशयापासून वेगळी काढता येत नाही.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

या ठिकाणी बालकवींची एक लयसमृद्ध अशी एक कविता घेऊन ती समजावून घेतली. त्यांच्या एकंदरीत सर्वच कवितांमधून लय हा एक महत्त्वाचा किंबहुना " जाणवणारा " घटक आहे हे आपल्या लक्षात येते; परंतु आता प्रश्न असा उपस्थित होतो की, प्रत्येक कवितेलाच लय असते. मग बालकवींच्या कवितेतील लयीचे वेगळे वैशिष्टच काय ? ती ' जाणवते ' म्हणजे काय ?

" मी सतत शोधतो आहे
ती मेलेली माणसे
त्यांनी जिवनी केलेली
तीच माणसे पुन्हा मरूनही गेल्याचे
( त्यांच्या आत्म्यांना पुन्हा शांतता लाभो. )

–ही कविता श्री. वामन इंगळे यांच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या ' सूर्यसप्तक ' या कवितासंग्रहातील आहे. या कवितेला लयपूर्ण नाही असे म्हणण्याचे कोण धैर्य करील ? परंतु या कवितेतील लय अशी नजरेत भरत नाही. तिचे निराळे अस्तित्व जाणवतानाही.

आणि बालकवींच्या कवितेतील लयीचे नेमके वैशिष्टचच हेच आहे की ती नजरेत भरते. तरीही परंतु हे ' नजरेत भरणे ' कवितेला मारक होत नाही. नुसतीच लय असती तर असे होऊ शकले असते. परंतु या ठिकाणी लय आणि आशय यांचा जन्मच दुसऱ्यातून झाला आहे. असा एकमेकातून जन्म होत असताना तालबद्ध, नादबद्ध, यमकानुप्रासयुक्त ओळी येतात. आणि त्यामुळे ती नजरेत जशी भरते तशीच ती कवितेला मारकही ठरत नाही. आणि कवितेपासून फुटूनही निघत नाही.








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

डॉ. नी. र. वऱ्हाडपांडे

# सत्तावनचे स्वातंत्र्ययुद्ध आणि त्याचे निंदक

## (५)

सत्तावनच्या युद्धाची फलश्रुति काय ?

परसत्तेविरुद्ध एवढ्या विस्तृत प्रदेशावर एकाच वेळी उठाव झाल्याचे उदाहरण भारताच्या इतिहासात दुसरे नाही. या क्रांतियुद्धात एक लाख शिपाई व एक लाख नागरिक वीरांनी आपल्या प्राणांची आहुति दिली, या वीरांनी दिल्ली, औध रोहिलखंड, कानपूर, झाशी व ग्वालेर या भागात इंग्रजी सत्ता समूळ नष्ट केली होती. याशिवाय मध्यप्रदेश, मध्यभारत, पश्चिम बिहार येथे देखील क्रांतीची ज्वाला पेटली होती. एकूण एक लाख वर्ग मैल भूमि मुक्त झाली होती व चार कोटि भारतीय स्वराज्याचा आस्वाद घेऊ लागले होते.

पण हे सर्व एक वर्षाच्या आत संपले ! संपेना ! ! "क्षण एक पुरे" स्वत्वाचा "वर्षाव घडो मरणांचा, मग पुढे ! !" भारताच्या इतिहासात या एका वर्षाचे मूल्य पुढील ९० वर्षांच्या कुत्तेमोल जिण्याच्या मानाने अनन्य-साधारण आहे.

फाटक म्हणतात सत्तावनची क्रांति यशस्वी झाली असती तर भारत खंडित झाला असता. ती फसल्यामुळे पुढे अखंड भारताला स्वराज्य मिळाले ! ! ४७ साली "झेलमचे अश्रु" वाहून भारत खण्डित झाला हा ताजा इतिहास फाटकांच्या स्मरणात नाही. कदाचित् हे खण्डित स्वातंत्र्य अखंड करण्यासाठी चिनी आक्रमणाचे स्वागत करून चीन्यांना पाकिस्तानसकट सारे हिंदुस्थान द्वीपकल्प व्यापू द्यावे व मग त्यांच्याविरुद्ध शंभर वर्षे सत्याग्रह करून अखंड भारताचे स्वराज्य स्थापन करावे अशी अभिनव योजना फाटकांच्या मनांत घोळत असेल ! !

वर्षभराचे स्वराज्य स्थापन झाले यापेक्षा अधिक चिरस्थायी अशी या युद्धाची फलश्रुति म्हणजे भारताचे ख्रिस्तीकरण करण्याचा प्रयत्न इंग्रजांनी

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कायमचा सोडून दिला. भारतीयांच्या धर्मात ढवळाढवळ करणार नाही असे व्हिक्टोरिया राणीने आपल्या घोषणापत्रात आश्वासन दिले. यापुढे ख्रिस्तीकरणाचे जे प्रयत्न झाले त्यात इंग्रजांनी उघडपणे व मोठ्या प्रमाणावर आपल्या राजकीय सामर्थ्याचा उपयोग केला नाही.

"हा उठाव दडपून टाकण्याच्या आपल्या प्रयत्नामुळे पुढे होणाऱ्या यापेक्षाही मोठ्या या उठावांची बीजे रोवली गेली आहेत" ही टाइम्सच्या लेखकाला वाटलेली भीति मात्र खरी ठरली नाही. ब्रिटिशांच्या विरुद्ध सत्तावनच्या तोडीचा उठाव पुढे कधीच झाला नाही, सत्तावनच्या युद्धात भारतीयांना ब्रिटिशांच्या विरुद्ध म्हणण्यासारखा जय कुठेच मिळाला नाही. त्यामुळ भारताच्या बऱ्याच मोठ्या भागात उठाव झाला नाही. झालेले उठावदेखील इंग्रजांनी इतक्या क्रूरतेने मोडून काढले की भारतीयांना इंग्रजांच्या सामर्थ्याची कायमची दहशत बसली. इंग्रजांचा पराभव करण्याची महत्त्वाकांक्षा मूर्खपणाची आहे अशी धारणा झाल्यावर "जे आपल्या नशीबी अपरिहार्यपणे आले आहे त्या इंग्रजी राज्यातच काय चांगले गुण आहेत हे पहावे, उगीच आकाशकुसुमासारख्या असलेल्या स्वातन्त्र्यासाठी धडपडण्यात काय अर्थ," अशी भारतीयांची प्रवृत्ती होऊ लागली.

## तात्या टोपेचे तेजस्वी उद्‌गार

या प्रवृत्तीला खतपाणी पुरविण्याचे काम इंग्रजी शिक्षणाने केले. हे केवळ शिपायांचे बंड होते; राष्ट्र, स्वातन्त्र्य वगैरे कल्पनाच मुळात आम्ही तुम्हाला शिकविल्या, सत्तावन सालच्या तुमच्या अडाणी पूर्वजांना त्यांचा गंधही नव्हता, आम्ही येण्याच्या आधी भारतात स्वराज्य होतेच कुठे, केवळ मराठ्यांची लूटमार सुरू होती, तिला पायबंद घालून आम्हीच येथे शांतता स्थापित केली वगैरे इंग्रजी मंत्रांची जपमाळ भारतीय सुशिक्षित ओढीत होते. सत्तावनच्या संग्रामाबद्दलच्या स्मृति इंग्रजी शिक्षणाने याप्रमाणे दूषित केल्या नसत्या तर टाइम्सच्या लेखकाला वाटल्याप्रमाणे ब्रिटिशराज्याविरुद्ध अधिक सामर्थ्यशाली उठाव घडवून आणण्याची स्फूर्ति देण्याचे सामर्थ्य त्याच्यात खचितच होते, हे सावरकरांनी १८५७ चे स्वातंत्र्यसमर हा ग्रंथ लिहून उत्कृष्टपणे दाखवून दिले आहे. एका देशभक्तामागे दहा देशद्रोही निघाले व रणांगणावर सतत पराभव झाला ही सत्तावनची कहाणी वाचताना अंतःकरण कष्टी होते हे खरे आहे. पण या शोकान्तिकेत देखील भवितव्याबद्दल आशा निर्माण करणाऱ्या अनेक घटना आहेत. त्यापैकी काही घटनांचा आता विचार करू.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तात्या टोपेवर राजद्रोहाचा अभियोग चालविण्यात आला तेव्हा स्वतःच्या कृत्याचे त्याने जे संक्षिप्त समर्थन केले ते अन्वर्थक आहे "मी जे केले ते माझे धनी पेशवे यांच्या आज्ञेने केले. युद्धाव्यतिरिक्त इतरत्र मी कुणाचीही हत्या केली नाही." असे तात्या टोपेचे उद्गार आहेत. या उद्गारांचे गर्भितार्थ महत्वाचे आहेत. ते म्हणजे इंग्रजाविरुद्ध युद्ध करण्याचा आदेश देण्याचा पेशव्यांना अधिकार होता. कारण ते या देशाचे सार्वभौम शासक होते. या आदेशाचे पालन करणे हा गुन्हा होऊ शकत नाही. सत्तावनचे युद्ध हे देशाचे राज्यकर्ते व इंग्रज आक्रमक यांच्यातले युद्ध होते. आक्रमकाविरुद्ध युद्ध हे बंड होऊ शकत नाही. अर्थात तात्या टोपेच्या अपराधांची चौकशी करायची असेल तर युद्धाव्यतिरिक्त हत्या करण्याचा मानवतेविरुद्ध अपराध त्याने केला की नाही एवढ्याच गोष्टीची फक्त चौकशी व्हायला पाहिजे. अर्थात ही भूमिका इंग्रजांची सत्ता मुळातच नाकबूल करणारी पूर्णस्वातंत्र्यवादी भूमिका होती.

दत्तक बाप

नानासाहेब पेशवे पराभूत होऊन देशोधडीला लागले, पण त्यांचे मन पराभूत झाले नाही. ब्रिटिश सरकारला त्यांनी जे पत्र लिहिले ते या संबंधात वाचण्यासारखे आहे. "मी तुमच्याशी लढलो व जिवात जीव आहे तोपर्यंत लढणार. मी कोणताही अपराध केलेला नाही, कुणाचाही खून केला नाही. मीही माणूस आहे. मी तुमच्यापासून दोन कोसावर राहतो. तुमचे राष्ट्र मोठे बलाढ्य आहे. माझे सैन्य माझ्या आज्ञा पाळत नाही. मला पाय टेकण्यास भूमि उरलेली नाही. तरीपण तुम्ही दोन वर्षे लढूनही माझा नाश करू शकला नाही हे आश्चर्य आहे. मी दोन वर्षापासून काही सैन्य राखून ठेवले आहे. ते काय करू शकते हे मी लवकरच दाखवीन. आपण लवकरच भेटू व मग तुमच्या रक्ताचे गुडघाभर खोल पाट वहातील. ब्रिटिशासारख्या बलाढ्य राष्ट्राचा मी शत्रु म्हणून ओळखला जातो, हा माझा मोठाच मान मी समजतो. मरण कोणालाही चुकत नाही. मग मी का भ्यावे ?"

दुसऱ्या एका पत्रात नानासाहेब म्हणतात, "तुम्ही सांगता त्याप्रमाणे मी शरण येणार नाही. एखाद्या फरेंच सेनापतीच्या मार्फत खुद्द तुमच्या राणीचे पत्र आले तर मी त्याची दखल घेईन. नाहीतर तुमच्याशी जे बोलायचे ते मी तलवारीने बोलेन."

नानासाहेबांनी यात असे सूचित केले आहे की "मी भारताचा पेशवा. माझा दर्जा इंग्लंडच्या राणीबरोबरचा आहे. चालू युद्ध हे ईस्ट इंडिया कंपनी व

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तिचा नाना नावाचा प्रजाजन यांच्यातील युद्ध नसून भारत व इंग्लंड यांच्यातील युद्ध आहे. भारताचे पेशवे इंग्लंडच्या राणीशी बातचीत करतील. कंपनीच्या अधिकाऱ्यांना ते ओळखीत नाहीत."

होप ग्रांटला लिहिलेल्या पत्रात नानासाहेब म्हणतात, "भारतात हात-पाय पसरून मला चोर ठरविण्याचा तुम्हास काय अधिकार? या देशावर राज्य करण्याचा अधिकार तुम्हास कोणी दिला? तुम्ही फिरंगी भारताचे राजे आणि आम्ही भारतवासी आमच्याच देशात चोर! खासा न्याय!!"

"बंडवाल्यांनी" कोठेही इंग्रजांचा पराभव केल्याचे उदाहरण नाही म्हणून न. र. फाटक हिणवितात. त्यांच्या व मजुमदारांच्या लिहिण्याचा झोक असा की जणू इंग्रजांचे पराक्रम हे त्यांच्याच बापजाद्याचे पराक्रम होते. लक्ष्मी-बाई, तात्या टोपे, कुमारसिंग वगैरे मंडळी ही सावरकरासारख्या "काला आदमी" ची पूर्वज मंडळी होती. मुलगा दत्तक घेण्याची चाल आहे. पण या लेखकांनी बाप दत्तक घेण्याचा जो उपक्रम केला आहे तो अपूर्व आहे. "बंड-वाल्यांनी" इंग्रजांचा पराभव केला नाही म्हणून पारतंत्र्य कायम राहिले हे सावरकरांसारख्या सत्तावनच्या अभिमान्यांना चांगले माहीत आहे. सत्तावनचे वीर युद्धसामर्थ्यात इंग्रजांपेक्षा वरचढ होते अशी फुशारकी सत्तावनच्या कोणत्याही अभिमान्याने मारलेली नाही. इंग्रजांचा पराभव करणे नेपोलियन व हिटलर-सारख्या योद्धांनाही जमले नाही. ते राणी लक्ष्मीबाई, तात्या टोपे व कुमारसिंग यांना जमले नाही यात आश्चर्य नाही. अशा अजिंक्य शत्रूविरुद्ध या वीरांनी दोन हात केले व धारातीर्थी देह ठेवला हीच मोठ्या अभिमानाची गोष्ट आहे.

दुसरे असे की इंग्रजांची भाटगिरी करताना मजुमदारांनी बऱ्याच भाकड-कथा खऱ्या मानल्या आहेत. लखनौ व कानपुर येथे मूठभर इंग्रजांनी हजारो शिपायांना कसे थोपवून धरले याची अद्‌भुतरम्य वर्णने इंग्रज लोकांनी दिली आहेत. मजुमदारांनी कोणतीही चिकित्सकता न दाखविता त्यांच्या सुरात सूर मिळविला आहे. लखनौ व कानपुर येथे इंग्रज व स्वातंत्र्ययोद्धे यांचे तौलनिक बलाबल काय होते याचा स्वातंत्र्ययोद्धांच्या बाजूच्या व्यक्तींनी लिहिलेला सविस्तर वृत्तांत उपलब्ध नाही. अशा वृत्तांतास आधारभूत अशी कागदपत्रे ज्यांच्याजवळ होती त्यांनी ती इंग्रजांच्या भीतीने जाळून टाकली. पण झाशीच्या वेढ्याचा विष्णुभटाने लिहिलेला वृत्तांत उपलब्ध आहे. त्यावरून इंग्रजांच्या वृत्तांतात बऱ्याच थापा असतात असे स्पष्ट दिसते. ह्यू रोजने अवघ्या दोन हजार फौजेनिशी झाशीला वेढा घातला व १५०० सैनिकांच्या साहाय्याने


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तात्या टोपेच्या २२००० फौजेचा पराभव केला अशी रोजची भाटगिरी मजुमदारांनी गायिली आहे. विष्णुभटाने रोजच्या फौजेची संख्या ६०००० व तात्या टोपेच्या फौजेची दहा ते पंधरा हजार दिली आहे. यावरून इतर ठिकाणच्या लढायातील इंग्रजांनी दिलेली भारतीय फौजांची संख्या कितपत विश्वसनीय मानावी हे दिसून येईल. इंग्रजांच्या देखील निरनिराळ्या वृत्तांतात मेळ नाही. होप ग्रांट म्हणतो की लखनौच्या वेढ्यात "बंडवाल्यांच्या" सैन्यात ३०००० शिपाई व ५०००० स्वयंसेवक होते. मलेसनच्या मते ही संख्या १२१००० होती व सेनापति कॉलिन बरोबर गेलेला सिव्हिल कमिशनर म्हणतो की ही संख्या दोन लक्ष होती !! इंग्रजांनी दिलेले शत्रुसैन्याच्या संख्येचे आकडे मनःपूत फुगवून दिलेले आहेत. व स्वतःच्या सैन्याची संख्या चोरून ठेवली आहे. भारतीय सैनिक इंग्रजांच्या फौजेतील सैनिकापेक्षा संख्येने फारसे अधिक असण्याचा संभव नाही. शिवाय इंग्रजांचा तोफखाना व इतर शस्त्रसामग्री श्रेष्ठ होती. तात्या टोपे व लक्ष्मीबाई यांचा पराभव का झाला हे यावरून स्पष्ट आहे.

"वीरोत्तमा" लक्ष्मीबाई

सत्तावनच्या वीरांचा पराभव झाला असला तरी इंग्रजांचा रणांगणावर पराभव करणे शक्य आहे असे वाटण्याइतपत त्यांचा पराक्रम नेत्रदीपक होता. राणी लक्ष्मीबाई, तात्या टोपे व राजा कुमारसिंग हे तिघेही आपापल्या परीने लोकोत्तर होते. त्यांच्यात सरस नीरस ठरविणे अशक्य आहे. पण १९५७ च्या स्वातंत्र्यदिनी सत्तावनच्या वीरांना श्रद्धांजलि वाहताना पं. नेहरू म्हणाले त्या-प्रमाणे सत्तावनच्या संग्रामात "सबसे प्यारा नाम झाशीकी रानी लक्ष्मीबाईका है।" राणी लक्ष्मीबाईचे दर्शन वीर व देशभक्त या स्वरूपात होते तसेच त्याच्या जोडीला एक लोकोत्तर स्त्री व लोकोत्तर राणी म्हणून देखील होते. जॉन लँग नावाच्या वकिलाने तिचे पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे –

"ती मध्यम बांध्याची होती. तिचा चेहरा पूर्ण वर्तुळाकार होता. चेहऱ्यावर बुद्धिमत्तेचे तेज झळकत होते. वर्ण निमगोरा होता. डोळे तीक्ष्ण व नाक नाजुक वळणाचे होते. सोन्याच्या कर्णभूषणाव्यतिरिक्त अंगावर काही दागिने नव्हते. ती तलम मलमलीची शुभ्र साडी नेसत असे. राणीच्या बांध्याचा आकार धारण करून विराजमान झालेली ती साडी पाहिली की त्या बांध्याचे शिल्प किती मनोहर आहे याचा प्रत्यय येई. तिचा आवाज मात्र या नाजुक सौंदर्यास साजेसा नव्हता." कारण तो योद्ध्याचा आवाज होता. त्या सुंदर

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्त्रीच्या शरीरात योद्धयाचे व्यक्तित्व वास करीत होते. याचा प्रत्यय रणांगणाव्यतिरिक्त इतर ठिकाणी तिच्या करारी आवाजातून येत असे. याच करारी आवाजात तिने मे. एलिसला सांगितले "नहि दूंगी मेरी झाशी ! ! "

## राणीचे रामराज्य

प्रातःकाली पाचला उठून ती आपल्या दिनचर्येस प्रारंभ करी. अभ्यंग स्नानानंतर तुलसीपूजा व नंतर दरबारच्या गायकाच्या सुरांनी पार्थीवपूजेस आरंभ होत असे. पुढे पुराणश्रवण व मग दरबार. दरबारात शेकडो लोक येत पण त्यातला एखाद्या दिवशी आला नाही तर ते तिच्या नजरेतून सुटत नसे. दरबारचे काम झाल्यावर भोजन व वामकुक्षी. नंतर नजराण्यांचे परीक्षण. दुपारी तीनला पुनः दरबार. या दरबारात ती मर्दानी पोषाख करी. खाली पायजमा, कमरेत कशिद्याचा दुपट्टा व तलवार, गळयात मोत्याची माळ आणि डोक्यास फेटा. दरबारच्या दिवाणखान्यात उघडणाऱ्या एका लहान खोलीत तिचे सिंहासन असे. या खोलीच्या दारावर सोनेरी नक्षी काम व चिकाचे पडदे असत. दाराबाहेर सोने व रुप्याच्या गदा धारण करणारे हुजरे दक्षतेने उभे असत. समोर दिवाणजी व त्याच्या मागे दप्तरदार असत. कोणत्याही कागदातला मुद्दा राणीच्या चाणाक्ष बुद्धीस तेव्हाच अवगत होई व त्यावर ती स्पष्ट व निःसन्दिग्ध असे आदेश देई.

मंगळवारी व शुक्रवारी महालक्ष्मीच्या दर्शनाचा कार्यक्रम असे. महालक्ष्मीचे देऊळ कमळानी भरलेल्या एका तळयाच्या काठाशी होते. राणी महालक्ष्मीस जाण्यास निघाली की राजवाडयातला चौघडा वाजे व महालक्ष्मीच्या मंदिरातला चौघडा त्यास साथ देई. एकदा देवळावरून परत येताना शेकडो भिकारी राणीच्या मार्गात आले. राणीने चौकशी केली तेव्हा तिला सांगण्यात आले की हे भिकारी थंडीने कुडकुडत आहेत. हे ऐकून त्या दीनवत्सल राणीचे हृदय द्रवले व तिने साऱ्या भिकाऱ्यांना गरम कोट, टोप्या व कांबळी वाटण्याचा हुकूम दिला. लढाईत जखमी झालेल्या शिपायांची ती जातीने शुश्रूषा करी. शौर्याने कोण लढले याची अचूक माहिती तिला असे व शूरांचा सत्कार करण्यास ती कधी चुकली नाही.

खास प्रसंगी राणीची स्वारी निघे तिचा थाट काय वर्णावा ! ती कधी पालखीत तर कधी मर्दानी पोषाखात घोडयावर स्वार असे. तिच्या पुढे व मागे शंभर शंभर स्वार व अग्रभागी झाशीचा झेंडा फडकत असे.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## झाशीचा वेढा

राणीच्या रामराज्यात सुखाने राहणाऱ्या झाशीवर ६०००० इंग्रजी फौजेची धाड आली. तात्या टोपे मदतीस आला पण त्याचे सामर्थ्य अपुरे पडले व त्याला माघार घ्यावी लागली. याप्रमाणे पुढे पराभव आ वासून उभा असताना ती धैर्यशाली डगमगली नाही. ती आपल्या शिपायांना म्हणाली:—

" आजपर्यंत झाशी लढली ती पेशव्यांच्या भरवशावर लढली नाही व पेशव्यांचा पराभव झाला म्हणून झाशी रणांगण सोडणार नाही. आजपर्यंत शौर्याने लढलात तसेच लढत रहा."

साऱ्या बाजूने इंग्रज हल्ला करीत होते. त्यांना तोंड देण्यास राणी स्वत:च्या सैनिकांना प्रोत्साहन देऊ लागली. कुणाला तिने सोन्याचे कडे बक्षीस दिले, कुणाला पोषाख दिले, कुणाला शाबासकी दिली, कुणाचा आपल्या अमृत-तुल्य स्मिताने सत्कार केला तर कुणाला आपल्या धीरगंभीर वाणीने प्रोत्साहन दिले, राणीचे सैनिक प्राणपणाने लढू लागले. गुलाम गौसखान व कुवर खुदाबक्ष हे राणीचे गोलंदाज मुख्य दरवाजावर चाल करून येण्याऱ्या इंग्रजावर गोळ्यांचा वर्षाव करू लागले. बुरुजा-बुरुजावरून अग्निशस्त्रे आग ओकू लागली. गोळ्या व उल्कास्त्रे यांचा पाऊस पडला. त्यातून " हरहर महादेव " " मारो फिरंगीको " म्हणून राणीचे सैनिक गर्जना करू लागले. ले. डिक् व ले. मॅक्लेजॉन शिड्यांवरून चढून गोऱ्या शिपायास " आगे बढो " म्हणून आदेश देत होते. त्याना राणीच्या गोळ्यांनी टिपले व झाशीवर आक्रमण करू पाहणाऱ्या त्या गोऱ्यांची शरीरे धाडकन कोसळली. त्यांच्यामागून ले. बोनस व फॉक्स चढून आले, पुन: राणीच्या सैनिकांनी फैरी झाडल्या, पुन: फिरंगी खाली कोसळले. त्या बरोबर इंग्रजी शिड्या हादरल्या. गोऱ्या फौजेला परतण्याचा आदेश देणारा बिगुल वाजला. दगडा-दगडा आड लपून गोरे शिपाई माघार घेऊ लागले.

या प्रसंगाचे वर्णन करताना लो. म्हणतो की प्लूटो हा नरकाधिपति व कराल सर्पकेशी ग्रीक देवता फ्लूरी याच जणू इंग्रजी सैन्यावर तुटून पडल्या होत्या.

मुख्य दरवाजाने इंग्रजांना पिटाळून लावले पण फितुराने दक्षिणेकडील मोर्चा— दरवाजा शत्रूच्या स्वाधीन केला. इंग्रज सैनिकांच्या झुंडीच्या झुण्डी आत येऊ लागल्या व त्यांनी सशस्त्र व नि:शस्त्र, बाल वा वृद्ध, स्त्री वा पुरुष, यांची कत्तल करायला सुरुवात केली.

ते दृश्य पाहताच महिषासुरमर्दिनीचे रक्त उसळून आले. अवघे पंधराशे निवडक सैनिक घेऊन ती किल्याखाली उतरली व नंगी समशेर घेऊन इंग्रजावर



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तुटून पडली. गोऱ्यामागे गोरा राणीच्या तलवारींनी कापला गेला. ते पाहून उरलेले गोरे सैनिक शहराकडे पळाले व घरे, विहिरी वगैरेंच्या आडोशाने बंदुका चालवू लागले.

राणीचे शौर्य पाहून सर्वांनाच स्फुरण चढले. राणीचे अवघे पन्नास शिपाई पागांचे रक्षण करीत होते. ह्यू रोज साठ हजार सैन्यानिशी झाशीवर चालून आलेला होता. पण राणीच्या पन्नास सैनिकांपैकी प्रत्येकजण मारला गेला तेव्हाच इंग्रजांना पागा सर करता आल्या.

परशुरामाचा पर्वतभेदी बाण

झाशी इंग्रजांच्या सेनासमुद्रात बुडाली तेव्हा राणीने इंग्रज सैन्याची फळी फोडून काल्पीस पेशव्यांना जाऊन मिळण्याचा डाव रचला. सुमारे तीनशे निवडक स्वार बरोबर घेतले. पायात पायजमा, अंगात तारेचे चिलखत, कमरेस जंबिया व तलवार व पाठीस रेशिमकाठी धोतराने दत्तकपुत्र दामोदर बांधलेला, अशा वेषात ती आपल्या जातिवंत घोड्यावरच आरूढ झाली, इंग्रजी फौज आडवी आली तेव्हा "हर हर महादेव" गर्जना करीत ती तिच्यावर तुटून पडली. दूरच्यास बंदुकीच्या फैरी झाडून व जवळ येऊ धजावणाऱ्यास तलवारीने कंठस्नान घालीत ती जी भरधाव निघाली ती एखादा बाण ढालीस भेदून बाहेर पडावा त्याप्रमाणे इंग्रजी फौजेची फळी फोडून पार झाली.

मुख्य फौजेची फळी फोडून राणी पार गेल्यावर ले. बोकर पाठलागास निघाला. पण राणीच्या विद्युद्वेगी घोड्याने त्याला कित्येक मैल मागे टाकले. सकाळच्या प्रहरी राणी भंडीर नावाच्या खेड्यात पोचली. तेथील महालकऱ्याने राणीचा सत्कार करून तिला भोजन दिले.

सकाळची न्याहरी उरकून पुन: काल्पीकडे घोडा पिटाळला तोच बोकरची तुकडी पाठीवर येऊन आदळली. राणीजवळ अवघे पंधरावीस सैनिक उरले होते. बाकीचे शत्रूची फळी फोडून आपल्या प्राणप्रिय राणीचा प्राण वाचवण्यात धारातीर्थी पडले होते, वा वाट चुकून अन्य मार्गाने गेले होते. बोकरला पाहताच राणी मागे फिरली, तिची तलवार विजेसारखी चमकली. बोकर घोड्यावरून खाली पडला. राणीचा प्रसाद मिळाल्यावर त्याने पाठलागाचा नाद सोडून दिला. राणीने परत काल्पीकडे धाव घेतली. सकाळपासून सुरू झालेली ही घोडदौड मध्यरात्रीपर्यंत सतत सुरू होती. मध्यरात्री राणी सुखरूप काल्पीस पोचली. १०/१२ वर्षांचा मुलगा पाठीस बांधून तिने १०२ मैल अंतर कापले एवढेच नव्हे तर वाटेत बोकरासारख्या योद्ध्याला पाणी पाजले !


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

राणी सुखरूप पोचली पण तिचा विश्वासू सेवक, तिचा लाडका घोडा, राणी खाली उतरल्यावर धाडकन् मूर्च्छित पडला. कर्तव्यपूर्ति होईपर्यंत ते मुके जनावर तहानभूक व थकवा विसरले होते. पण कर्तव्य संपल्याबरोबर शरीराचे दौर्बल्य प्रकट झाल्याशिवाय राहिले नाही ! ५७ सालच्या अनेक मानवदेहधारी देशद्रोह्यांपेक्षा त्या मुक्या जनावराचे जीवन अधिक उदात्त होते !

## काल्पी व ग्वाल्हेर

पुढे ह्यू रोज काल्पीवरही चालून आला. त्याला तोंड देण्यासाठी पेशव्यांची सेना पुढे सरसावली. बिनीच्या तुकडीने सरळ हल्ला केला पण तिला मागून तोफांचा पाठिंबा अपुरा पडल्यामुळे माघार घ्यावी लागली. हे पाहून राणीने आपला घोडा पुढे घातला; तिचे केशरी घोडदळही मागोमाग आले. झंझावातासारखा हा हल्ला झाल्याने इंग्रजांच्या उजव्या बाजूने कच खाल्ली व त्यांची फौज पळू लागली. मागे तोफखाना होता तो राणीच्या घोडदळावर आग ओकू लागला. पण चार भाडोत्र्यांच्या तोफांचे गोळे त्या स्वातंत्र्यदेवतेला अडवणार काय ? ती बेधडक तोफखान्यावर चालून गेली. काही गोलंदाज तिने कापून काढले. उरलेले तोफा सोडून पळाले.

पुढे क्रांतिकारकांचा मोर्चा ग्वाल्हेरवर वळला. शिंदे स्वातंत्र्ययुद्धात सामील होतील असे पेशव्यांना वाटत होते. पण जयाजीराव शिंदे आपली सारी फौज घेऊन आपल्या धन्यावरच चालून आला. शिंद्यांना जोडेराखणीतून मुक्त करून सिंहासनावर बसवणारे पेशवे हे त्याला शत्रु वाटत होते व देशाचे शत्रु फिरंगी हे त्याचे धनी झाले होते.

जयाजी शिंदे पेशव्यावर चालून येत आहे असे पाहून राणीने आपले तीनशे सैनिक सिद्ध केले व सरळ जयाजीराव शिंदे व त्यांचे अंगरक्षक "भालेघाटी" यांच्यावर ती तुटून पडली. राणीचा हा हल्ला होताच जयाजी व त्याचे भालेघाटी, शेपुट दाबून पळाले, बाकीचे सारे सैन्य पेशव्यांचा जयजयकार करीत क्रान्तिकारकांच्या निशाणाखाली आले.

## सूर्यमण्डळ भेदिले

ग्वाल्हेर सर झाले. आपल्या क्रांतीची ज्योत विझविली असे ह्यू रोजला वाटत होते, पण त्या क्रान्तीचा लहानसा स्फुलिंग राणीच्या रूपाने ग्वाल्हेरीवर पडला व ती ज्योत पुनः नव्या तेजाने धगधगू लागली.

ग्वाल्हेर सर केल्यावर इंग्रजी फौज ग्वाल्हेरवर चालून येईपर्यंत पेशव्यांना पंधरा दिवसांची उसंत मिळाली होती. तिचा उपयोग सैन्याची शिस्त व सज्जता

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वाढविण्यासाठी करावा म्हणून राणीने खडसावून सांगितले. पण पेशव्यांनी राज्याभिषेकाचे उत्सव करण्यात व्यर्थ वेळ घालविला. राणीची दक्षता पेशव्यात नव्हती.

इंग्रज प्रचंड सैन्य घेऊन ग्वाल्हेरवर चालून आले. राणी त्यांच्याशी सामना देण्यास पुनः सज्ज झाली. पूर्व दरवाजाचे रक्षण करण्याची कामगिरी तिच्यावर सोपविण्यात आली होती. इंग्रजांच्या बाजूने या आघाडीची जबाबदारी जनरल स्मिथवर होती. राणीने काशी व मुन्दर या आपल्या सख्यांना युद्धाचे पाठ दिले होते. सैनिक वेषात त्याही घोड्यावर आरूढ झाल्या. जनरल स्मिथने अनेकवेळा राणीच्या फळीवर हल्ला केला. पण समुद्राच्या लाटा कितीही उसळल्या तरी पर्वतावर आदळून ओसरतात त्याप्रमाणे स्मिथच्या सैनिकांना पुनः पुनः मार खाऊन परतावे लागले. तेव्हा राणीचा पराभव करण्याचा नाद सोडून त्याने आपला मोर्चा दुसरीकडे वळविला.

राणीच्या शेवटच्या संगरलीलेचा वृत्तांत निश्चित नाही. घोड्यावर स्वार होऊन ती व तिची प्राणप्रिय सखी मुन्दर एका टेकडीवरून शत्रुसैन्याची टेहेळणी करीत असता फिरंगी गोळी लागून मरण पावल्या व मग भोवतालच्या लोकांनी घाईने राणीचा दहनविधि उरकून घेतला असे रॉबर्ट हॅमिल्टन म्हणतो, उलट मॅक्फर्सनचा वृत्तांत प्रचलित वृत्तांताशी अधिक जुळतो. प्रचलित वृत्तांताप्रमाणे तिच्या साऱ्या सैन्याचा मोड झाल्यावर ब्रिटिश हुसार तिचा पाठलाग करू लागले. पुढे राणी व मागे मुंदर घोड्यावर स्वार होत्या. मुंदर मागे पडू लागली. तिला एका फिरंग्याने गाठले "बाईसाहेब मेले!!" म्हणून मुंदरची किंकाळी ऐकू आली. राणीचे हृदय कालवले. स्वतःच्या सुरक्षिततेची फिकीर न करता ती मागे वळली, मुंदरचे प्राण घेणाऱ्या फिरंग्याला तिने कंठस्नान घातले व पुनः वेगाने घोडा पुढे फेकला. घोडा एका ओढ्याजवळ आला. राणीला ओढ्याच्या पलीकडे जायचे होते पण घोडा बुजला व ओढ्यावरून उडी न मारता तेथेच घुटमळू लागला. फिरंगी पाठीशी येऊन थडकले, तेव्हा राणी परत फिरली. तिची तलवार म्यानातून निघाली. राणीची एक तलवार व फिरंग्यांच्या तलवारी अनेक. वैश्वानराच्या सप्त जिव्हा स्वातंत्र्याच्या उमलत्या कलिकेला ग्रासू लागल्या. एक वार डोक्यावर लागला व उजवा डोळा लोंबू लागला. दुसरा वार छातीवर लागला. तिचे प्राण कंठाशी आले. पण त्याही परिस्थितीत जमिनीवर कोसळली नाही, घोड्यावरच पालथी बिलगून राहिली. तो विश्वासू घोडा तिला गर्दीतून बाहेर घेऊन आला. जवळच एका गवताच्या गंजीवर तिला विधिपूर्वक अग्नि देण्यात आला!!

◆ ◆ ◆



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

डॉ. वा. वि. मिराशी

# कोल्हापूरच्या महालक्ष्मीचे देवालय कोणी व केव्हा बांधले?

कोल्हापूर हे दक्षिण काशी म्हणून आज कित्येक शतके प्रसिद्ध आहे. तेथील महालक्ष्मीच्या देवालयाची गणना १०८ भारतीय शाक्तपीठांमध्ये केली जाते.[१] देवीभागवत पुराणात ( ७, ३८, ५–६ ) महाराष्ट्रातील प्रमुख शाक्त तीर्थांची गणना पुढील श्लोकात केली आहे.[२]

कोलापुरं महास्थानं यत्र लक्ष्मीः सदा स्थिता ।
मातुः परं द्वितीयं च रेणुकाधिष्ठितं परम् ॥
तुलजापुरं तृतीयं स्यात् सप्तशृङ्गं तथैव च ।

– मार्कंडेय पुराणातील देवीमाहात्म्यात (किंवा सप्तशतीत) महाकाली, महालक्ष्मी आणि महासरस्वती अशी देवीची त्रिगुणात्मक तीन रूपे आणि त्यांनी महिषासुर, शुंभ, निशुंभ इत्यादी असुरांचा संहार करून केलेले देवादिकांचे रक्षण वर्णिले आहे. हे माहात्म्य निदान ख्रिस्तोत्तर आठव्या शतकापूर्वीचे आहे, कारण त्यातील एक श्लोक हर्ष संवत् १८९ ( ७९५–९६ ) च्या दधिमाता कोरीव लेखात उद्धृत केला आहे.[३] त्यापूर्वी काही शतके ख्रिस्तोत्तर पाचव्या सहाव्या शतकापर्यंत त्याचा काळ असावा, हे पार्जिटरचे मत ग्राह्य दिसते. विदिशेजवळ उदयगिरि टेकडीतील एका गुप्तकालीन लेखात द्वादशभुजा महिषासुरमर्दिनी महालक्ष्मीची मूर्ति कोरली आहे.[४] तिजवरून त्या देवीची

१. दिनेशचंद्र सरकार यांचा शाक्तपीठांवरचा लेख ( जर्नल ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी ऑफ बेंगाल, व्हॉ. १४, पृ. ६९ )

२. पूर्वोक्त, पृ. १०७

३. आमचे स्टडीज इन इंडॉलॉजी, व्हॉ. २, पृ. २००– २०६ पाहा.

४. विक्रम व्हॉल्यूम, पृ. ४११– १२.



अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पूजा निदान ख्रिस्तोत्तर पाचव्या शतकात प्रचलित होती असे दिसते. त्यापूर्वीचा निश्चित असा पुरावा मात्र सध्या ज्ञात नाही.

त्यानंतर महालक्ष्मीची पूजा उत्तर व दक्षिण भारतात सर्वत्र पसरलेली दिसते. प्रा. ग. ह. खरे यांनी कोल्हापूरच्या महालक्ष्मीच्या देवळाचे सूक्ष्म निरीक्षण करून आणि त्यातील कोरीव लेखांचा अभ्यास करून असा निर्णय केला आहे की 'ते शके ९०० च्या पूर्वीचे असेल असे वाटत नाही. फार तर गाभाराच थोडा प्राचीन (शके ८००) असण्याचा संभव आहे.'[5] पण त्यापूर्वीच्या शक संवत् ७९३ (सन ८७१) च्या राष्ट्रकूट नृपति प्रथम अमोघवर्ष याच्या संजान ताम्रपटात तिचा उल्लेख खालील श्लोकात[6] आला आहे हेही त्यानीच दाखविले आहे.

सर्पं पातुमसौ ददौ निजतनुं जीमूतकेतोः सुतः
श्येनायाथ शिबिः कपोतपरिरक्षणार्थं दधीचोऽर्थिने ।
तेऽप्येकैकमतर्पयन्किल महालक्ष्म्यै स वामांगुलिं
लोकोपद्रवशान्तये स्म दिशति श्रीवीरनारायणः ॥

एकदा अमोघवर्षाच्या राज्यात एका महान व्याधीचा फैलाव झाला. हजारो लोक मृत्युमुखी पडू लागले. तेव्हा ज्योतिष्यांच्या सांगण्यावरून अमोघवर्षाने आपल्या डाव्या हाताची करंगळी महालक्ष्मी देवीला अर्पण करून तो लोकोपद्रव शांत केला. या प्रसंगाला अनुलक्षून वरील श्लोक रचला आहे. त्यात म्हटले आहे की जीमूतकेतूचा पुत्र जीमूतवाहन याने एका सर्पाला वाचविण्याकरिता आत्मबलिदान केले. शिबि राजाने एका पारव्याला वाचविण्याकरिता बहिरी ससाण्याला आपले शरीर अर्पण केले, दधीचीनेही याचक इंद्राला तसेच स्वात्मार्पण केले. पण या वीरनारायण (अमोघवर्ष) राजाने एकेकट्या व्यक्तीचे नव्हे तर आपल्या राज्यातील लाखो प्रजाजनांचे उपद्रवापासून रक्षण करण्याकरिता आपल्या डाव्या हाताची अंगुली महालक्ष्मीला अर्पण केली.

या संजान ताम्रपटाचा काल शकसंवत ७९३ (सन ८७१–७२) आहे. प्रस्तुत श्लोकातील उल्लेख कोल्हापूरच्या महालक्ष्मीचाच असला पाहिजे. कारण त्या काळी त्या नावाची दुसरी देवता राष्ट्रकूटांच्या साम्राज्यात प्रसिद्ध नव्हती. त्याकाली तिची विशेष प्रसिद्धी असली पाहिजे. अर्थातच तिचे देवालयही

५. ग. ह. खरे, महाराष्ट्राची चार दैवते, पृ. ७६, श्री. खरे यांनी हे देवालय कोणी बांधले याची चर्चा केली नाही.

६. एपिग्राफिया इंडिका, व्हा. १८, पृ. २४६.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्या काळी अस्तित्वात असून ते लोकांच्या श्रद्धेचे व भक्तीचे प्रमुख पीठ झाले होते असे अनुमान करण्यास हरकत नाही. तसे नसते तर राष्ट्रकूटांच्या सारख्या महान साम्राज्याचा अधिपति लोकोपद्रवनिवारणार्थ आपली करांगुली तिला अर्पण करण्यास तयार होताना. अर्थातच त्यावेळी हे देऊळही अस्तित्वात असले पाहिजे तेव्हा त्याच्या कालाची उत्तरमर्यादा सन ८७१ किंवा नवव्या शतकाचा उत्तरार्ध ही दिसते.

महालक्ष्मीचे देवालय भव्य आहे. त्याला नंतरच्या काळात काही भाग जोडले असले तरी त्या त्रिकूट प्रासादाचे गर्भगृह व सभामंडप हे तरी प्राचीन होत यात संशय नाही. हे देऊळ बाहेरून तारकांकित ( star-shaped ) असून त्याच्या बाहेरच्या भिंतीना तापस, सुरसुंदरी, नर्तिका वगैरेंच्या मूर्तींनी सुशोभित केले आहे. नवव्या ते अकराव्या शतकात बांधलेली अशी देवालये विदर्भात मार्कंडी, कोकणात अंबरनाथ वगैरे ठिकाणी अद्यापि विद्यमान आहेत, त्यांमध्ये हे देवालय प्राचीन आहे. कारण याच्या भिंतीवर त्यांच्याइतके प्रतिमाप्राचुर्य आढळत नाही.

अशी भव्य देवालये राजाश्रयाशिवाय बांधली जात नसत. तेव्हा आठव्या –नवव्या शतकात ज्यांनी हे देवालय बांधले असेल असे महाराष्ट्रात कोण राजे राज्य करीत होते याचा आता विचार करू.

प्राचीन काळी हा कृष्णाकाठचा प्रदेश कुंतल देशात अंतर्भूत होत होता. या प्रदेशाचा प्राचीन इतिहास बराचसा अज्ञात आहे. खिस्तोत्तर २५० पर्यंत हा सातवाहनांच्या अमलाखाली होता. पुढे हा काही काळ वाकाटकांच्या व नंतर पूर्वकालीन राष्ट्रकूटांच्या ताब्यात गेला असे दिसते. या राष्ट्रकूटांची राजधानी मानपूर ( सातारा जिल्ह्यातील माण ) येथे होती. त्यांना 'कुंतलाधिपती' म्हणत. हे राजे उत्तर भारतातील गुप्तांचे समकालीन होते. त्यांच्या दरबारी द्वितीय चंद्रगुप्त–विक्रमादित्य याचा राजकवि कालिदास दूत म्हणून आला होता अशी आख्यायिका राजशेखर, भोज, क्षेमेंद्र यानी उल्लेखिली आहे. तिची चर्चा आम्ही इतरत्र केली आहे.[७]

खिस्तोत्तर सातव्या शतकात हा प्रदेश बदामीच्या चालुक्यांनी जिंकून घेतला. द्वितीय पुलकेशीने प्रथम याबर आपला भाऊ कुब्ज विष्णुवर्धन याची

७. संशोधन मुक्तावलि : सर ५, पृ. १२६–१३०



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नेमणूक केली होती.[८] पण पुढे त्याने त्यास वेंगीचे राज्य देऊन हा प्रदेश स्वतःच्या राज्यात समाविष्ट केलेला दिसतो. यानंतरचा या प्रदेशाचा इतिहास मात्र अद्याप बराचसा अज्ञात आहे.

चालुक्यांच्या नंतर हा प्रदेश उत्तरकालीन राष्ट्रकूटांच्या अमलाखाली गेला असता तो त्यांनी आपल्या साम्राज्याच्या इतर प्रदेशांप्रमाणे कोणा सामंताच्या स्वाधीन केला असावा. पण त्याविषयी निश्चित माहिती आपणास नाही. तथापि अनुमान करण्यास साधन आहे.

कर्नाटकातील वनवासी—संतलिगे या भागात राज्य करणारा ईश्वर नामक सिंदवंशी सामंत ( ज्ञातवर्षे सन ११६५ व ११७२ ) आपले वर्णन 'करहाटपुरवराधीश्वर ' ( करहाट— सध्याचे सातारा जिल्ह्यातील कऱ्हाड— या श्रेष्ठ नगराचा अधिपती ) असे करतो.[९] याचा अर्थ तो त्याकाळी कऱ्हाड येथे राज्य करीत होता असा करावयाचा नसून त्याचे पूर्वज एका काळी करहाट येथे राज्य करीत होते असा केला पाहिजे. हे प्राचीन भारतीय इतिहासज्ञांसच माहीत आहे. दक्षिणेतील गुप्तराजे 'उज्जयिनीपुरवराधीश्वर' कलचुरि राजे 'माहिष्मतीपुरवराधीश्वर', कोकण व कोल्हापूरचे शिलाहार राजे 'नगरपुरवराधीश्वर' असे स्वतःचे वर्णन करतात तेव्हा त्याचा अर्थ असाच करावा लगतो. तेव्हा सिंदराजेही एके काळी दक्षिण महाराष्ट्रात करहाट ( कऱ्हाड ) येथे राज्य करीत होते असे अनुमान करता येते.

पण अशा अनुमानाला काही उपोद्बलक प्रमाण आहे काय ? असा प्रश्न उपस्थित होतो. त्याचा विचार आता करू.

पुष्कळ वर्षांपूर्वी एका ताम्रपटाचा एकच पत्रा खानदेशचे गो. कृ. चांदोरकर यांना मिळाला होता. तो सध्या धुळ्याच्या राजवाडे संशोधन मंडळात ठेवला आहे. त्याच ताम्रपटाचा दुसरा एक पत्रा पुण्याच्या भारत इतिहास संशोधक मंडळात आहे. तो कोठे सापडला माहीत नाही. मूळ ताम्रपट तीन किंवा चार पत्र्यांचा असावा. पूर्वोक्त दोन पत्र्यांवर त्या ताम्रपटाचा शेवटचा भाग कोरला आहे. त्यापूर्वीचा भाग आता अगोदरचे पत्रे गहाळ झाल्यामुळे ज्ञात नाही.

---

८ याचा आरंभीचा ताम्रपट सातारा येथे सापडला आहे त्यावरून त्याच्या अमलाखाली सातारा—पंढरपूर हा प्रदेश होता असे कळते. ज. ऑ. बाँ. ब्रँ. ए. सो. व्हॉ. ३ पृ. ११.

९. पालि, संस्कृत, अँड ओल्ड् कॅनरीच इन्स्क्रिप्शन्स्, क्र. ११९.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सुमारे बत्तीस वर्षापूर्वी सध्या उपलब्ध असलेल्या दोन पत्र्यांचे संपादन डॉ. मो. गं. दीक्षित आणि आह्मी एपिग्राफिया इंडिका, व्हा. २५, पृ. १६४–१७१ मध्ये केले होते. हा ताम्रपट अपूर्ण असला तरी प्रस्तुत विषयाच्या विवेचनाच्या दृष्टीने महत्वाचा आहे.

हा ताम्रपट सिंदवंशी आदित्यवर्म्याने जुन्नि नगरमध्ये वास्तव्य असताना मध्यदेशातून आलेल्या नवशिव नामक ऋग्वेदी ब्राह्मणाला दिला होता. त्यांत त्याने त्या ब्राह्मणाला रामतीर्थिका-८४ विभागातील पंगरिका नामक मोठ्या गावात अन्तर्भूत झालेले किणिहिका गाव शक संवत् ८८७, क्रोधन संवत्सर, चैत्र अमावास्येला झालेल्या सूर्यग्रहण प्रसंगी दान दिल्याचा निर्देश आहे. हा कालोल्लेख बरोबर जमतो. गतशक संवत् ८८७ ला क्रोधन संवत्सर होते. त्या वर्षी चैत्र अमावास्येस सूर्यग्रहणही होते. त्याची इंग्रजी तारीख ६ मार्च सन ९६५ अशी येते.

हे दान देणारा आदित्यवर्मा हा सिंदवंशी होता. प्रस्तुत ताम्रपटात त्याचा पिता मुंज आणि आजा भीम यांची नावे आली आहेत. त्यापूर्वीची त्याच्या पूर्वजांची नावे प्रस्तुत ताम्रपटाचे अगोदरचे पत्रे गहाळ झाल्यामुळे सांगता येत नाहीत. आदित्यवर्म्याचे वर्णन त्याने पंचमहाशब्द प्राप्त करून घेतले होते, तो महासामन्त होता, तो फणीन्द्रवंशात ( नागवंशात ) जन्मला होता, त्याचा ध्वज सुवर्णसिंहांकित होता असे केले आहे.

प्रस्तुत ताम्रपट नक्की कोठे सापडला हे माहीत नसले तरी त्यांत उल्लेखिलेल्या किणिहिका गावाच्या सीमा सांगताना लयणगिरि आणि इंद्रनदी याचा उल्लेख केला आहे त्यावरून त्यात निर्दिष्ट केलेली स्थाने निश्चित करता येतात. ही इंद्रनदी म्हणजे पुणे तालुक्याच्या उत्तरेस वाहणारी इंद्रायणी होय. दान दिलेले किणिहिका गाव हे शेलारवाडी जवळचे किन्हई गाव होय. त्याच्या पश्चिमेस कांही लेणी असलेली टेकडी आहे तीच प्रस्तुत ताम्रपटात उल्लेखिलेला लयणगिरि, प्रस्तुत ताम्रपट देताना ज्या जुन्निनगरात आदित्यवर्म्याचा मुक्काम होता ते सध्याचे जुन्नर. या स्थलनिश्चयावरून प्रस्तुत ताम्रपट देणारा सिंदवंशी राजा आदित्यवर्मा हा पश्चिम महाराष्ट्रात पुणे–सातारा–कोल्हापूर या भागावर राज्य करीत होता हे उघड आहे. तो आपणास महासामन्त म्हणवतो. तो तत्कालीन राष्ट्रकूट सम्राट तृतीय कृष्ण याचा मांडलिक असावा.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रस्तुत ताम्रपटात या सिंद राजाच्या राजधानीचा निर्देश नाही. पण सिंदराजांच्या 'करहाटपुरवराधीश्वर' या बिरुदावरून ती बहुधा करहाट येथे असावी.

प्रस्तुत ताम्रपट सन ९६५ चा आहे. त्यात त्या काळी राज्य करणाऱ्या आदित्यवर्म्याच्या दोन पूर्वजांचा निर्देश आहे. अगोदरचे पत्रे गहाळ झाल्यामुळे त्यापूर्वी किती पिढ्या हे राजे तेथे राज्य करीत होते, हे समजण्यास मार्ग नाही. तथापि ख्रिस्तोत्तर नवव्या–दहाव्या शतकात या भागात त्यांचे राज्य होते यात संशय नाही. याच कालात कोल्हापूरच्या महालक्ष्मीचे देवालय सुप्रसिद्ध होते हे आम्ही मागे राष्ट्रकूटनृपती प्रथम अमोघवर्ष याच्या संजान ताम्रपटावरून दाखविले आहे. तेव्हा ते देवालय करहाट- ( कऱ्हाड ) च्या कोणा सिंदवंशी राजाने आठव्या–नवव्या शतकात बांधले असावे असे अनुमान केल्यास ते बहुधा चूक होणार नाही.

या सिंदवंशाचा आणखी एक, शक संवत् ९३३ चा, ताम्रपट जुन्नर जवळ नारायणगाव येथे सांपडला होता असे डॉ. मो. गं. दीक्षितांनी मला कळविले होते. पण तो त्यांनी कोठे प्रसिद्ध केला माहित नाही, तो कोणाच्या संग्रही असल्यास त्यांनी तो प्रसिद्ध करावा. कदाचित त्यायोगे प्रस्तुत प्रश्नावर जास्त प्रकाश पडेल.

शक संवत् ९३३ नंतर लौकरच या सेंद्रक वंशाचे कऱ्हाडहून उच्चाटन झालेले दिसते. यानंतर शिलाहारांनी हा प्रदेश जिंकून कऱ्हाड येथेच आपली राजधानी केली. या वंशातील मारसिंह नामक राजाच्या (सुमारे सन १०५०-७५ चंद्रलेखा नामक अत्यंत सुंदर कन्येच्या करहाट येथे झालेल्या स्वयंवराचे उत्कृष्ट वर्णन बिल्हण कवीने आपल्या विक्रमांकदेवचरितात ( सर्ग ८ व ९ ) केले आहे. त्या स्वयंवरात तिने उत्तरकालीन चालुक्य सम्राट विक्रमादित्य[१०] याला वरले होते.

त्यानंतर शिलाहारांना आपली राजधानी करहाटहून कोल्हापुरला हलवावी लागली. यानंतरचे त्यांचे सर्व कोरीव लेख कोल्हापुरच्या आसमन्तात् सापडले आहेत. ते कोल्हापुरच्या महालक्ष्मीचे उपासक होते. आपणांस श्रीमहा-

१०. बिल्हणाने शिलाहार राजाचे नाव न देता त्याचे 'करहाटपति' असे वर्णन केले आहे. तथापि त्याच्या कालावरून तो मारसिंह असावा.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लक्ष्मीचा वरप्रसाद प्राप्त झाला आहे. ( श्रीमहालक्ष्मीलब्धवरप्रसाद ) असे ते मोठ्या दिमाखाने आपल्या अनेक ताम्रपटात सांगतात. सन १२१३ च्या सुमारास शिलाहार वंशी द्वितीय भोजाचा उच्छेद करून यादव नृपति सिंघण याने कोल्हापुरास आपला अंमल बसविला. त्याचा कोरीव लेख श्रीमहालक्ष्मीच्या देवालयात विद्यमान आहे.[११]

असा हा श्रीमहालक्ष्मीच्या देवालयाचा प्राचीन इतिहास आहे. वरील विवेचनावरून कोल्हापूर येथील महालक्ष्मीचे देवालय निदान इ. स. नवव्या शतकाइतके प्राचीन असून ते बहुधा करहाट ( कऱ्हाड ) येथील कोणा सिंद राजाने बांधले असावे असे अनुमान करता येईल.[१२] यापेक्षा जास्त निश्चित विधान सध्या तरी करता येणे शक्य दिसत नाही.



११. महालक्ष्मीच्या देवळातील सिंघणाचा लेख शक संवत् ११४० ( सन १२१८–१९ ) चा आहे. महाराष्ट्राची चार दैवते, पृ. ४३.

१२. ते देवालय ख्रिस्तोत्तर सहाव्या शतकात कोणा कर्ण नामक राजाने बांधले या प्रा. कुंदणगारांच्या मताचे खंडन प्रा. ग. ह. खरे यांनी उत्तम प्रकारे केले आहे, पूर्वोक्त, पृ. ६३ इ.


चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान

— लेखक —

प्रा. सदाशिव आठवले

किं. ३ रु.

मिळण्याचें ठिकाण —

चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई.

[ जि. सातारा ]




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

डॉ. के. वा. आपटे

# भगवद्गीता : मोक्षमार्गाचे विवेचन : ३ :

## ज्ञानयोग

उपनिषदांनी ज्ञान हे मोक्षाचे साधन आहे, असा डिंडिम पिटला. 'ज्ञानाद् मोक्षः' हे उपनिषदांचे ब्रीदवाक्य आहे, असे म्हणण्यास हरकत नाही. ज्ञानाला दिले गेलेले हे महत्त्व भगवद्गीतेने डावललेले नाही. भगवद्गीतेमध्ये जेथे अनेक[1] यज्ञांचे उल्लेख येतात तेथे ज्ञानयज्ञाचा उल्लेख ( ४.२८ ) भगवद्गीतेने केलेला आहे. भगवद्गीतेच्या मते, द्रव्य यज्ञापेक्षा ज्ञानयज्ञ हा श्रेयस्कर आहे (श्रेयान् द्रव्यमयाद् यज्ञाद् ज्ञानयज्ञः परंतप। ४.३३ ) तसेच, मोक्षाला नेणारी[2] जी दैवी संपत् तिच्यामध्ये 'ज्ञानयोगव्यवस्थिति' आहे (१६.१).

मानवाचे अंतर्विश्व तसेच बाह्य विश्व हे त्रिगुणात्मक आहे. प्रत्येक वस्तु सात्त्विक[3], राजस किंवा तामस यापैकी कोणत्यातरी एका प्रकारात मोडते. याला ज्ञानही अपवाद नाही. ज्ञान हेसुद्धा सात्त्विक, राजस आणि तामस असे तीन प्रकारचे आहे (ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः। १८.१९). जे अल्प असून, तत्त्वार्थ न जाणता, एकाच कार्याच्या ठिकाणी जणु ते संपूर्ण आहे या बुद्धीने जे अकारण आसक्त असते, ते तामस ज्ञान होय (१८.२२). सर्व भूतांमध्ये पृथक प्रकारांनी अनेक भावांना जे पृथक्पणे जाणते, ते राजस ज्ञान होय (१८.२१). विभक्त असणाऱ्या सर्व भूतांत जे ज्ञान अविभक्त, अव्यय असा एक भाव पहाते, ते ज्ञान सात्त्विक होय ( १८.२० ). राजस आणि तामस ही दोनही ज्ञाने परमार्थदृष्टया त्याज्य आहेत; तिसरे सात्त्विक ज्ञान जरी बरेचसे

---

१ यज्ञांचे बाबतीत भ. गी. ने सांगितलेली पुढील गोष्ट लक्षात ठेवावी :— अनेक प्रकारचे यज्ञ ब्रह्माचे मुखात ( मुखापर्यंत ) पसरलेले आहेत; ते सर्व कर्मामुळे साध्य आहेत, असे जाणणारा माणूस मोक्ष मिळवितो. (४.३२)

२ दैवी संपद् विमोक्षाय। १६.५

३ के. वा. आपटे भगवद्गीताः त्रिगुणविचार, जर्नल ऑफ शिवाजी युनिव्हर्सिटी, खंड ५, १९७२ पहा.

अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

उपयोगी पडणारे असले, तरी शेवटी त्याच्याही पलीकडेच जावयाचे आहे. याचे कारण असे :– सत्त्वगुणाने ज्ञान प्राप्त होते ( सत्त्वात् संजायते ज्ञानम् । १४.१७ ). सत्त्व या गुणाची जेव्हा वृद्धि होते, तेव्हा ज्ञान हाती येते ( १४.११ ). पण सत्त्वगुणाने प्राप्त होणारे सुख आणि ज्ञान यांचा संग मात्र बंधनकारक आहे ( तत्र सत्त्वं... सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ ॥ १४.६ ). म्हणूनच या त्रिगुणी ज्ञानांच्या पलीकडचे मोक्षोपयोगी ज्ञान आवश्यक ठरते. निराळया शब्दांत सांगायचे झाल्यास, त्रिगुणी ज्ञाने ही व्यवहार-निगडित आहेत; आणि सत्तत्त्वाबद्दलचे ज्ञान हे मात्र मोक्षदायक आहे.

## ज्ञानाचे महत्त्व

संसारातून सुटका करून मोक्षाची प्राप्ति करविणारे ज्ञान हे अत्यंत महत्त्वाचे आहे आणि केवळ ज्ञानयोगातच ज्ञानाला महत्त्व आहे असे नाही, तर कर्मयोग व भक्तियोग यामध्येही ज्ञानाला[४] महत्त्वपूर्ण स्थान आहे, असे भगवद्‌गीतेचे सांगणे आहे.

केवळ अभ्यासापेक्षा ज्ञान हे श्रेयस्कर आहे ( श्रेयो हि ज्ञानमभ्यासात् । १२.१२ ). ज्ञानासारखे पवित्रकारक या जगात दुसरे काहीही नाही ( न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते । ४.३८ ). अत्यंत पापी माणूससुद्धा ज्ञानरूपी नौकेने पापरूपी समुद्र ओलांडून जातो ( अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः । सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ४.३६ ). ज्ञानामुळे ज्यांचे पाप धुऊन गेले आहे, त्यांना (या जगात) पुनरावृत्ति म्हणजे जन्ममरणचक्र म्हणजे बंध नाही ( गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः । ५.१७ ). एकदा का ज्ञान प्राप्त झाले की मग पुनः मोहाची बाधा होत नाही ( यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं

४ उदा. कर्मयोग साध्य करून घेतलेला माणूस योग्य काळाने ज्ञान प्राप्त करून घेतो (४.३८). कर्मयोगाने कर्माचा संन्यास केलेल्या व ज्ञानाने संशय दूर केलेल्या, अशा माणसाला कर्मे बंधनकारक ठरत नाही (४.४१). तसेच :– ज्ञानी भक्त ईश्वराला प्रिय असतो (७.१७), ज्ञानी भक्त हा ईश्वराचा आत्माच आहे ( ७.१८). ईश्वराच्या विभूति आणि योग तत्त्वतः जाणणाऱ्याला अविकंप असा ( भक्ति– ) योग निःसंशय प्राप्त होतो (१०.७). भक्तांना बुद्धियोग देऊन (१०.१०), त्यांचे अज्ञान ईश्वर दूर करतो (१०.११). जो ईश्वराला जाणतो, तो ईश्वराची भक्ति करतो (१५.१९).


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

यास्यसि पाण्डव । ४.३५). सर्व कर्मे ज्ञानामध्ये परिसमाप्त होतात ( सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते । ४.३३ ). ज्ञानरूपी अग्नि सर्व कर्मे भस्मसात् करून टाकतो ( ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते तथा । ४.३७ ). विज्ञानासहित ज्ञान प्राप्त[५] झाले की मग या जगात जाणून घ्यावयाचे (ज्ञातव्य) असे काही उरतच नाही ( यज्ज्ञात्वा नेहभूयोऽन्यद् ज्ञातव्यमवशिष्यते । ७.२ ). विज्ञानासहित ज्ञानाची प्राप्ति झाली[६] की अशुभ अशा संसारातून सुटका होते ( ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् । ९.१ ). ज्ञानातील उत्तम ज्ञान जाणून, मुनिजन परासिद्धीला–मोक्षगतीला जातात (यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितोगताः १४. १). ज्ञानाचे साहाय्याने ईश्वराशी साधर्म्य पावलेले लोक विश्वाच्या उत्पत्तीचे वेळी पुनः जन्माला येत नाहीत आणि साहजिकच प्रलयाचे वेळी व्यथित होत नाहीत (इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः । सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च ॥ १४. २ ). कारण ते जन्ममरणाच्या फेऱ्यातून सुटलेले आहेत.

## ज्ञानप्राप्तीसाठी आवश्यक गुण

ज्या ज्ञानाने या संसारातून सुटका होऊन अक्षय्य सुख मिळते, ते ज्ञान काही सहजासहजी मिळण्यासारखे नाही. हे ज्ञान प्राप्त होण्यास पुढे सांगितलेले[७] गुण अंगी बाणावे लागतात:– (१) अमानित्व– गर्व नसणे: आत्मश्लाघा न करणे (शंकराचार्य); श्रेष्ठांची अवधारणा न करणे (रामानुजाचार्य). (२) अदंभित्व–दंभाचा अभाव; स्वधर्म-प्रकटीकरणाचा अभाव. ( ३ ) अहिंसा– प्राण्यांना पीडा न देणे. (४) क्षान्ति-क्षमा; दुसऱ्यांनी अपराध केला तरी चित्ताचे निर्विकारत्व राखणे (नीलकंठ); दुष्टांचा अतिक्रम सहन करणे ( पुरुषोत्तम ). (५) आर्जव– सरळपणा, ऋजुता. ( ६ ) आचार्योपासन– सद्‌गुरूंची सेवा करणे. ( ७ ) शौच– काया, वाचा आणि मन यांची शुद्धता ( रामानुज ). ( ८ ) स्थैर्य– अध्यात्मशास्त्रात सांगितलेल्या गोष्टींचे बाबतीत निश्चलता ( रामानुज ); मोक्षमार्गावर स्थिरपणे रहाणे (शंकर) (९) आत्मविनिग्रह– देह, इंद्रिये, इत्यादींच्या प्रसारास अटकाव करणे ( नीलकंठ ); आत्मवस्तु सोडून इतर

---

५ याचा संबंध ७.४–३० कडे आहे.

६ याचा संबंध राजविद्या –राजगुह्य (अ. ९) याकडे आहे.

७ या गुणांची यादी १३.७–११ या श्लोकात आहे. टीकाकारांनी दिलेल्या स्पष्टीकरणाच्या आधारे या गुणांचे विवेचन येथे केलेले आहे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वस्तूपासून मन परावृत्त करणे (रामानुज) (१०) इंद्रियार्थेषु वैराग्यम्– शब्द, स्पर्श, इत्यादि इंद्रियविषयांच्या ठिकाणी वैराग्य. (११) अनहंकार–अहंकाराचा अभाव. (१२) जन्ममृत्यु जरा व्याधि- दुःखदोषानुदर्शन– शरीर आहे तोपर्यंत जन्म, मृत्यु, जरा, व्याधि यांचे दुःखरूपी दोष चुकत नाहीत, हे दृष्टीपुढे ठेवणे. (रामानुज) (१३) असक्ति– आसक्ति नसणे; आत्म्याखेरीज इतर पदार्थांचे ठिकाणी आसक्ति नसणे (रामानुज). (१४) पुत्रदारगृहादिषु अनभिष्वंगः – पुत्र, इत्यादि सुखी झाले असता आपण सुखी-दुःखी झालो असे न मानणे (वेंकटनाथ ब्रह्म): पुत्र, इत्यादींच्या ठिकाणी अति आसक्ति नसणे (रामानुज). (१५) इष्टानिष्टोपपत्तिषु नित्यं समचित्तत्वम्– इष्ट अथवा अनिष्ट गोष्टी प्राप्त झाल्या असता, चित्ताची समतोलवृत्ति कधीही न सोडणे. (१६) मयि चानन्ययोगेन अव्यभिचारिणी भक्तिः – ईश्वराच्या ठिकाणी अनन्यपणे स्थिररूपा अशी अव्यभिचारी भक्ति. (१७) विविक्तदेशसेवित्व– जनरहित प्रदेशी असणे: विविक्त म्हणजे शुद्ध म्हणजे चित्ताला समाधानकारक अशा स्थानात असणे (वेंकटनाथ ब्रह्म) (१८) जनसंसदि अरतिः – विषयी जनांच्या समूहात रहाण्याची आवड नसणे (वेंकटनाथ ब्रह्म). (१९) अध्यात्मज्ञान-नित्यत्व – आत्मज्ञाननिष्ठा (रामानुज). (२०) तत्त्वज्ञानार्थदर्शन– तत्व-ज्ञानाचे जे उद्दिष्ट– अविद्येची निवृत्ति आणि आनंदाची प्राप्ति– त्याचा विचार करणे (नीलकंठ). हे गुण असल्यास, ज्ञानाची सुलभपणे प्राप्ति शक्य होते.

### अज्ञानाचा नाश

सामान्यतः अज्ञानाने ज्ञान झाकाळून जाते व त्यामुळे प्राणी मूढ होतात (अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः। ५.१५ ). तसेच, 'कामा'नेही ज्ञान आच्छादून टाकले जाते. म्हणून कामाचा त्याग केला पाहिजे ('जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम्। ३.४३ ), कारण तो ज्ञान–विज्ञानाचा नाश करतो (पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम्। ३.४१ ). अज्ञानाचा नाशही ज्ञानानेच करावयाचा आहे आणि जे पुरुष ज्ञानाने अज्ञानाचा नाश करतात, त्यांचे बाबतीत सूर्याप्रमाणे ते ज्ञान पर (ब्रह्म) प्रकाशित करते. (ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः। तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत् परम्॥ ५.१६ ).

८ आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा। कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च॥ ... एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम्॥ ३.३९–४०

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ज्ञान कसे प्राप्त होते ?

ज्ञानाचा लाभ होण्यास[९] तत्परता, इंद्रियसंयम आणि श्रद्धा ह्या गोष्टी आवश्यक आहेत ( श्रद्धावॉंल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः । ४.३९ ). श्रद्धारहित अशा संशयी माणसाला ज्ञानाचा लाभ होत नाही. अज्ञानी, श्रद्धारहित व संशयात्मा असा जो मनुष्य आहे त्याचा नाश होतो; संशयात्म्याला सुख मिळत नाही; त्याला इहलोकही नाही[१०] व परलोकही नाही. म्हणून अज्ञानाने उत्पन्न होणाऱ्या संशयाचा ज्ञानरूपी खड्गाने छेद केला पाहिजे ( ४. ४२ ).

ज्ञान मिळविण्यासाठी एवढीच सिद्धता पुरी पडत नाही. साक्षात्कारी पुरुष अथवा अनुभवी तज्ज्ञ यांचे प्रत्यक्ष मार्गदर्शन व उपदेश हे अत्यावश्यक आहेत. आणि प्रणिपात, परिप्रश्न व सेवा या साधनांनी तत्त्वदर्शी पुरुषांचेपासून ज्ञान प्राप्त करून घेतले पाहिजे ( तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया । उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिस्तत्त्वदर्शिनः ॥ ४. ३४ ).

कोणते ज्ञान मोक्षदायक ?

व्यावहारिक ज्ञान किंवा या जगातील पदार्थाविषयीचे ज्ञान हे परमार्थाचे दृष्टीने निरुपयोगी आहे. तर या जगाचे जे अंतिम तत्त्व किंवा सतत्त्व, त्याविषयीचे जे ज्ञान आहे तेच मोक्षप्रद आहे. भगवद्गीतेने अनेक[११] सत्तत्त्वांचा निर्देश केला आहे. त्यामुळे पुढील प्रकारच्या सत्तत्वविषयक ज्ञानाने मोक्षप्राप्ति होते, असे भगवद्गीतेचे सांगणे आहे :—

१) प्रकृतिपुरुष ज्ञान— पुरुष आणि गुणांसह प्रकृति यांना जो जाणतो, त्याला पुनर्जन्म नाही, त्याला मोक्षाचा लाभ होतो. ( य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह । सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥ १३.२३ ). २) आत्मज्ञान— काहीजण ज्ञानयोगाने (सांख्य) आत्म्याला[१२] पहातात. आत्मा गुणांच्या पलीकडे आहे व तो त्याहून श्रेष्ठ आहे हे ज्ञान ज्याला होते, तो ईश्वरभाव[१३] प्राप्त करून घेतो. (१४.१९) ३) ब्रह्मज्ञान— ब्रह्मवेत्ता ब्रह्माभध्येच

९ हे ज्ञान प्राप्त होताच लौकरच परा शांति —मोक्ष— प्राप्त होते (४.३९).

१० अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।
नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४.४०

११ के. वा. आपटे, भगवद्गीताः सत्तत्त्व, जीवनविकास, डिसेंबर १९६४ पहा.

१२ ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना ।
अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेण चापरे ॥ १३.२४

१३ कारण ईश्वरच आत्मा आहे ( अहमात्मागुडाकेश । १०.२०)

अनुक्रमणिका

मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

रहातो ( ब्रह्मविद् ब्रह्मणि स्थितः । ५.२० ) ब्रह्म हे ज्ञेय आहे; ते जाणल्यावर अमृतत्वाची– मोक्षाची– प्राप्ति होते. ( ज्ञेयं यत् तत् प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वामृतमश्नुते । १३.१२) ४) क्षेत्रक्षेत्रज्ञज्ञान– क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यामधील भेदाचे ज्ञान जे ज्ञानदृष्टीने पहातात आणि भूतप्रकृतिमोक्ष जाणतात, ते पर पदाप्रत[१४] जातात [ भूतांची प्रकृति म्हणजे अविद्या, तिचे अभावीकरण ( शंकराचार्य ) किंवा भूतांच्या आकारात परिणत झालेल्या प्रकृतीपासून सुटण्याचा उपाय ( रामानुज ), असे अर्थ भूतप्रकृतिमोक्ष शब्दाचे दिले जातात ]. ५ ) ईश्वरज्ञान[१५]– ईश्वराचे ज्ञान झाल्याने मोक्षाचा[१६] लाभ होतो. ईश्वर हा अज अनादि आणि सर्व लोकांचा महेश्वर आहे. हे जो शहाणा माणूस जाणतो, तो सर्व पापातून[१७] (तसेच पुण्यातूनही) मुक्त होतो. ईश्वराला कर्माचा बंध नाही; ईश्वराची आसक्ति कर्माच्या फळात नाही; अशाप्रकारे ईश्वराला जो जाणतो, तो कर्मानी बद्ध होत नाही ( न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा । इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते।। ४. १४ ). ईश्वराचा दिव्य असा जन्म आणि कर्म जो तत्त्वतः जाणतो, तो या देहाचा त्याग केल्यावरही पुनर्जन्म न घेता, ईश्वराप्रत जातो ( जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः । त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैतिमामेति सोऽर्जुन ॥ ४. ९ ) ईश्वर हा यज्ञ व तप यांचा भोक्ता आहे; तो सर्व लोकांचा महेश्वर असून सर्व भूतांचा मित्र आहे. हे जाणून शांति प्राप्त होते. ( भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् । सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥ ५,२९ ). राग, भय आणि क्रोध यानी रहित, ईश्वरमय झालेले, ईश्वरावलंबी, आणि ज्ञानरूपी तपाने पावन झालेले लोक ईश्वरभाव प्राप्त[१८] करून घेतात.



१४ क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा । भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ॥ १३.३४. सर्व क्षेत्रामध्ये ईश्वर हा क्षेत्रज्ञ आहे (१३.२)

१५ काही लोक ज्ञानयज्ञाने ईश्वराची पूजा आणि उपासना करतात ( ९.१५). सर्व क्षेत्रात ईश्वरच क्षेत्रज्ञ आहे, हेही जाणले पाहिजे (१३.२).

१६ तसेच :– ब्रह्मभूत झालेला पुरुष तत्त्वतः ईश्वर कोण आहे व केवढा आहे, हे जाणून मग ईश्वरात प्रवेश करतो ( १८.५५ ). अनेक जन्मांचे शेवटी ज्ञानी भक्त ईश्वराप्रत जातो ( ७.१९ ) जर ईश्वराचे ज्ञान झाले नाही, तर इतर देवतांचे भक्त च्युत होतात ( ९.२४ ).

१७ यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् ।
असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ १०.३

१८ वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।
बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ ४.१०

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ग्रंथपरिचय –

## ' संस्कृत ' व्याख्या 'कारांची नाटकसमीक्षा* '

डॉ. त्र्यं. गो. माईणकर यांचा ' नाटयशास्त्रांतील संधि व संध्यंगे ' या संबंधी एक प्रबंध १९६० साली इंग्रजीतून प्रसिद्ध झाला. या विषयाचा अभ्यास करताना संस्कृत नाटकांतून ' संधि व संध्यंगे ' यांचा नाटयविकासात कसा प्रयोग केला आहे, हे पाहण्याकरिता त्यांनी संस्कृत नाटकांवरील प्रसिद्ध ' व्याख्या ' कारां- ( Commentators ) च्या व्याख्यां- ( Commentaries ) चे अत्यंत मार्मिकपणे करून अध्ययन केले. त्या अध्ययनाचे फलित संक्षिप्तपणे प्रस्तुत ग्रंथात त्यांनी प्रतिपादिले आहे.

पाश्चात्य साहित्यसमीक्षाशास्त्रा- ( Literary Criticism ) च्या दृष्टिकोनांतून संस्कृत नाटकांची समीक्षा करण्याची प्रथा अलीकडे रूढ होत चालली आहे. आधुनिक कालाच्या दृष्टीने ही प्रथा योग्य असली तरी, या प्रथेमुळे, आपल्याकडे पूर्वी होऊन गेलेल्या ' व्याख्या ' कारांनी आपल्या परंपरागत दृष्टिकोनांतून आपल्या संस्कृत ' व्याख्यां ' मधून जी संस्कृत नाटकांची समीक्षा केली आहे तिच्याकडे दुर्लक्ष करण्याची प्रवृत्ति वाढत आहे. ही प्रवृत्ति अनिष्ट होय, व संस्कृत नाटकांवरील संस्कृत ' व्याख्यां 'चा जर बारकाईने अभ्यास केला तर हे संस्कृत ' व्याख्या ' कार अत्यंत विद्वान, व्यासंगी पंडित व मर्मज्ञ कविहृदयी रसिक होते व त्यांच्या ' व्याख्या ' वाचीत असताना आपणाला संस्कृत नाटय-कृतीतील अभिजात सौंदर्याचा आस्वाद घडून आपण आल्हादित होतो व त्यांच्या बहुविध विद्वत्तेने आपण दिपून जातो, हे वाचकांच्या प्रतीतीस आणून देणे हे डॉ. माईणकरांच्या प्रस्तुत ग्रंथाचे प्रतिपाद्य आहे, व ते त्यांनी साधार, मार्मिक व प्रत्ययकारक रीतीने मांडले आहे.

---

* Studies in Sanskrit Dramatic Criticism– Dr. T. G. Mainkar, R. G. Bhandarkar Professor of Sanskrit, Bombay University, Publishers : Motilal Banarsidas DELHI – 7 (1–138) (1971) Rs. 15.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपल्या विवेचनाकरिता डॉ. माईणकरांनी पुढील 'व्याख्या'कार व व्याख्या निवडल्या आहेत : (१) 'मालती–माधवम्' या 'प्रकरणा'वरील पूर्णसरस्वती याची 'रसमञ्जरी.' (२ – ३) 'अभिज्ञान–शाकुन्तलम्' या 'नाटका'वरील राघवभट्ट याची 'अर्थद्योतनिका' आणि एका अनामिक व्याख्याकाराची 'अभिज्ञानशाकुन्तलचर्चा.' (४) 'उत्तररामचरितम्' या 'नाटका'वरील घनश्यामाचे 'संजीवन' नावाचे 'टिप्पण' किंवा 'व्याख्या.' (५) 'विद्धशाल–भञ्जिका' या नाटिकेवरील घनश्यामाच्या दोन पत्नी सुंदरी व कमला या दोघींची 'चमत्कारतरङ्गिणी' आणि (६) 'भगवदज्जु-कीयम्' या प्रहसनावरील एका नारायणभट्ट–शिष्याची 'दिङ्मात्र–दर्शिनी' –या सहा 'व्याख्यां'ची केलेली निवड व्यापक व प्रातिनिधिक आहे असे दिसून येईल. 'व्याख्या'कारांमध्ये स्त्री–व्याख्याकारही आहेत. शिवाय त्यात नाटयवाङ्मयाचे प्रकरण, नाटक, नाटिका आणि प्रहसन हे प्रमुख प्रकारही आले आहेत.

उत्तम साहित्यसमीक्षकाच्या अंगी कोणते गुण असावेत याचे सखोल व सोदाहरण विवेचन डॉ. माईणकरांनी १ल्या प्रास्ताविक प्रकरणात व शेवटच्या म्हणजे ८ व्या 'उपसंहार' प्रकरणात केले आहे. ते पाहता, या ग्रंथांतील वर्णि-लेल्या सर्व 'व्याख्या' कारांमध्ये राघवभट्ट हा एक असा आहे की जो साहित्य-समीक्षकांच्या कसोटीला जास्तीत जास्त उतरू शकतो, असे म्हणता येईल. या ग्रंथाच्या 'अर्थद्योतनिके' वरील तिसऱ्या प्रकरणात डॉ. माईणकरांच्या विवे-चनातून हाच निष्कर्ष निघू शकतो व तो अत्यंत योग्य व सयुक्तिक आहे, यांत शंका नाही. राघवभट्टाच्या ठिकाणी वैदग्ध्य व पांडित्य यांचा अत्यंत मनोज्ञ संगम झालेला आहे तो सहृदय व रसिक आहे. त्याने व्याख्येय कवीच्या जणू अंतरंगांत शिरून त्या कवीच्या काव्यपंक्तीतील सौंदर्य व रस अत्यंत आल्हादकारक रीतीने उलगडून दाखवून आपल्या 'व्याख्येचे' 'अर्थद्योतनिका' हे नाव सार्थ केले आहे. त्याच्या रसज्ञतेचे नमुने म्हणून डॉ. माईणकरांनी जी निवडक उदाहरणे दिली आहेत : (उदा० 'यौवनम् अंगेषु संनद्धम्' 'कथं नु तं बन्धुरकोमलाङ्गुलि-करम्' 'तुज्झ ण आणे हिअअं' यावरील राघवभट्टाची व्याख्या), ती अत्यंत समर्पक आहेत. विविध 'रसां'ची चर्चा तर राघवभट्ट जागोजाग करतो व शेवटी आपल्या व्याख्येच्या उपसंहारात त्याने शाकुन्तलातील प्रधान रस व त्याची उपांगे यांचे मार्मिक विवेचन केले आहे. याशिवाय त्यानेच आपले 'स्वतःचे' 'नाटचालंकृतिशास्त्रतत्त्वविद्वान्' असे वर्णन केल्याप्रमाणे तो नाटचशास्त्र, अलं-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कारशास्त्र, व्याकरण यांचा मोठा व्यासंगी पंडित असून, त्या पांडित्याचा उपयोग त्याने शाकुन्तलातील विविध स्थळांचा सौंदर्यास्वाद घडवून आणण्यात केलेला दिसून येतो.

नाट्यशास्त्रातून पारिभाषिक शब्दात सांगितलेल्या पाच 'अवस्था' भिन्न 'अर्थप्रकृति', 'संधि', 'संध्यंगे', 'नाट्यालंकार', 'भूषणे' ही सर्व शाकुन्तल नाटकात कोणत्या प्रसंगातून, पात्ररेखेतून कशी विखुरलेली आहेत व त्या योगाने कथानकाचा, पात्रांच्या भावनांचा व रसांचा कसा विकास व परिपाक घडून आला आहे हे त्याने जागोजाग दाखवून दिले आहे. त्याचप्रमाणे या अलंकारशास्त्रज्ञाने कालिदासाच्या श्लोकातून गर्भित असलेले अनेक अर्थालंकार स्पष्ट करून त्यांतील काव्याची खुमारी प्रत्ययास आणली आहे. कालिदासाची नादमधुर शैली छेकानुप्रासादी अलंकारांनी कशी नटलेली आहे हे दाखविण्यात राघवभट्टाचा हातखंडा आहे. म्हणूनच त्याने आपली व्याख्या 'अर्थद्योतनिका', 'सरसा', 'स्फुटा', 'ध्वनितदर्थालंक्रियानिर्भरा' आहे असे जे म्हटले आहे ते यथार्थच होय, असे सांगून डॉ. माईणकरांनी राघवभट्ट व त्यांची अर्थद्योतनिका यांचा आदर्श पाळणारे 'व्याख्या'कार अधिक झाले नाहीत याबद्दल खंत व्यक्त केली आहे! – 'अभिज्ञान–शाकुन्तलचर्चा' या खंडित स्वरूपात उपलब्ध झालेल्या 'व्याख्ये'चा अनामिक कर्ता (१५ वे शतक) महान् व्युत्पन्न नाट्यशास्त्रज्ञ आहे. नाट्यशास्त्रातील तंत्राप्रमाणे त्याने अवस्था, अर्थप्रकृति, संधि व संध्यंगे यांची स्थळे राघवभट्टाच्या पेक्षा भिन्न अशी दाखविली आहेत व 'शाकुंतला'त शृंगारचेष्टांमधून व्यक्त होणारी 'कैशिकी,' नायकाच्या धीरोदात्त गुणांतून प्रतीत होणारी 'सात्वती', दुर्वासाच्या शापातून प्रकट होणारी 'आरभटी' व सबंध नाटकातून दृग्गोचर होणारी (वागात्मिका) 'भारती' या 'वृत्तीं'चे दर्शन करून दिले आहे. या 'अभिज्ञानशाकुन्तल – चर्चाकारा'चे अनन्यसाधारण वैशिष्ट्य दोन गोष्टीत दिसून येते, असे डॉ. माईणकरांनी मार्मिकपणे दाखविले आहे. एक म्हणजे, महाभारतासारख्या इतिहासात प्रसिद्ध असलेली कथा घेऊन, तीत बदल करून कालिदासाने आपल्या नाटकाचे कथानक कसे सजविले आहे हे पहिल्या अंकातील नायकनायिकांच्या भेटीच्या 'परिकल्पने'चे उदाहरण देऊन स्पष्ट केले आहे. रसपरिपोषाकरिता 'प्रख्यात' म्हणजे ऐतिहासिक कथेत परिकल्पिता'चे किंवा 'उत्प्रेक्षा'चे कौशल्यपूर्ण मिश्रित रसायन करून प्रतिभाशाली कवि कशी किमया घडवून आणतो याकडे त्याने लक्ष वेधले आहे. आधुनिक समीक्षेला शोभणारी, ही १५ व्या शतकात होऊन गेलेल्या संस्कृत

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'व्याख्या'काराची ही विचक्षण बुद्धि बघून सुखद विस्मय वाटल्याशिवाय रहात नाही. या 'व्याख्या' काराचे दुसरे असामान्य वैशिष्ट्य म्हणजे नाटकाचा प्रयोग रंगभूमीवर कसा करीत असावेत याबद्दल त्याने केलेली चर्चा. पहिल्या अंकात मुळात दुष्यंत रथातून हरिणाचा पाठलाग करतो असे दाखविले आहे; परंतु हा 'व्याख्या'कार म्हणतो –"खरे म्हणजे रंगमंचावर राजा व सूत रथात बसलेले नाहीत. ते पायीच चालतात. रथ असा नाहीच. रथाची आकृति दाखवायची किंवा कोणीतरी 'रथ वेगाने धावत आहे' असे सांगायचे. ७ व्या अंकातील हेमकूट पर्वतावरून मारीचाश्रमापर्यंत रथावतरण अशाच सांकेतिक चिन्हांनी प्रदर्शित करायचे." अशा रीतीने ह्या अनामिक 'शाकुन्तलचर्चा'काराने आपला असामान्य बौद्धिक पैलू प्रगट केला आहे; शिवाय त्याने 'शाकुन्तला'चा 'रसनिर्भर', 'शृंगाररससर्वस्व', 'प्रसन्नगंभीर', 'रसनिष्यन्दी' अशा विशेषणांनी गौरव केला आहे. त्यावरून त्याची अभिजात रसिकता व्यक्त होते, हे डॉ. माईणकरांनी यथार्थपणे सूचित केले आहे. – डॉ. माईणकर यांनी दुसऱ्या प्रकरणात पूर्णसरस्वती व त्याची 'मालतीमाधवा' वरील 'व्याख्या' 'रसमञ्जरी' यांचे विवेचन केले आहे. पूर्णसरस्वती हा 'व्याख्या'कार विदग्ध रसज्ञ आहेच; शिवाय नाट्यशास्त्र, अलंकारशास्त्र, आगम, उपनिषदे, दर्शने व धर्मशास्त्रे इत्यादी ग्रंथांचे सखोल अध्ययन केलेला महापंडित आहे हे त्याने आपल्या संस्कृत 'व्याख्ये'तून उद्‌धृत केलेल्या उताऱ्यांवरून प्रतीतीस येते. त्याची 'व्याख्या' विस्तृत असून ती समासप्रचुर, प्रौढ, नादमधुर भाषाशैलीने नटलेली आहे. "मालती माधवस्योच्चैः आमोदं स्वं विवृण्वती। धार्या सहृदयैः प्रीत्या व्याख्येयं रसमञ्जरी ॥" अशा शब्दात आपली 'व्याख्या' सहृदयांना सादर करण्यात पूर्णसरस्वतीची रसज्ञता व आत्मविश्वासपूर्ण शालीनता दिसून येते. भवभूतीच्या नाटकांतील जे श्लोक व पदपंक्ति यांतील गूढ सौंदर्य त्याने अत्यंत रसिकतेने प्रकट करून दाखविले आहे, त्याची वेंचक उदाहरणे डॉ. माईणकरांनी समर्पक अशी उद्‌धृत केली आहेत. 'नवेषु लोध्रप्रसवेषु कान्तिः' या श्लोकात ध्वनित केलेले मालतीचे सौंदर्य, 'कण्डूकुड्मलितेक्षणां सहचरीं दन्तस्य कोटया लिखन् .... धन्यो वन्यमतंगजः परिचयप्रारंभमभ्यस्यति' या श्लोकांतील गजाची प्रणयक्रीडा यातून गर्भित असलेला ध्वन्यर्थ पूर्णसरस्वतीने अत्यंत सहृदयतेने उकलून दाखविला आहे. तसेच 'अपि कर्णजाहविनिवेशिताननः प्रियया तदङ्गपरिवृत्तिमाप्नुयाम्' या श्लोकपंक्तीतील व्यंग्यार्थाचे विवरण करताना या 'संन्यासी' पूर्णसरस्वतीने वात्स्यायनाच्या काम-



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सूत्राच्या आधारे 'तिलतण्डुल' नावाचे संभोगालिङ्गन येथे अभिप्रेत आहे असा अर्थ काढला आहे. 'केतकीनाम्... अभिनव इव सान्द्रो माकरन्दः परागः' या श्लोकपंक्तीत केतकीकुसुमात मकरन्द असतो असे जे भवभूतीने सूचित केले आहे ते सदोष मानून जगद्धर, नान्यदेव या टीकाकारांनी 'माकरन्दः' ह्याला दुसरे पाठांतर सुचविले आहे. परंतु पूर्णसरस्वतीने 'माकरन्द' या पाठाचे समर्थन केले असून, ज्या अर्थी केतकी हे कुसुम आहे त्या अर्थी त्यात 'मधु' हा असलाच पाहिजे हे कारण दिले आहे. मधु असला तर तो मिळण्याइतका विपुल नाही; एवढाच अर्थ 'अपसर मधुकर दूरम्... केतकीकुसुमे नहि मधु-लवलाभः भवति परं धूलिधूसरं वदनम्' या सुप्रसिद्ध अन्योक्तीत अभिप्रेत आहे, असे त्याने म्हटले असून त्यात त्याची स्वतंत्र सूक्ष्म चिकित्सक दृष्टी दिसून येते. भवभूतीच्या 'भूम्ना रसानां गहनाः प्रयोगाः' या प्रतिज्ञेला अनुसरून, पूर्णसरस्वतीने नाटकातील कथानकाच्या व पात्ररेखांच्या विकासात जागोजागी अवस्था, संधि, सध्यंगे यांचे दिग्दर्शन केले असून त्या योगाने होणाऱ्या रसभाव-परिपोषाचे हृद्य विवेचन केले आहे. उपनिषदे, गीता, ब्रह्मसूत्रे, योगसूत्रे, महाभारत, मनुस्मृति यातून त्याने आपल्या 'व्याख्ये' तील विवेचनाला आधारभूत वचने उद्धृत केली आहेत. माधव व मालती यांचा विवाह हा 'गांधर्व' विधीप्रमाणे नसून 'प्राजापत्य' विधीप्रमाणे आहे असे त्याने साधार युक्तिवादपूर्वक मांडले असून त्यात त्याची स्वतंत्र दृष्टी दिसून येते. शेवटी, पूर्णसरस्वती याच्या डॉ. माईणकर यांनी विवेचिलेल्या आणखी एका वैशिष्टयाचा उल्लेख करणे उचित होईल. त्याने आपल्या 'व्याख्ये'च्या अखेरीस 'मालतीमाधवा' तील पात्रांच्या रूपकात्मकतेचे दिग्दर्शन केले आहे. "माधव हा साक्षात् लक्ष्मीपति नारायण होय. विष्णु हा तर शृंगाराची अधिष्ठात्री देवता. मालती ही लक्ष्मी. मकरन्द हा 'रसो वै सः' या वचनाप्रमाणे परमा-नन्दरूप परमेश्वर शिव आणि मदयन्ती ही जगन्मोहिनी महामाया भवानी" इत्यादि. पूर्णसरस्वतीने 'मालतीमाधवा'तील पात्रांचा हा लावलेला रूपका-त्मक अर्थ त्याच्या नावीन्यपूर्ण बुद्धिचातुर्याचा द्योतक असला तरी तो अत्यंत दूरान्वित असून रसावह वाटत नाही. 'मालतीमाधव' हे एक सामाजिक नाटक आहे व त्यावर हे वैष्णव-शैवरूपक बसविणे ही अर्थाची भलतीच ओढाताण होय. डॉ. माईणकरांना याची जाणीव आहे. दुसरा एक व्याख्याकार त्रिपुरारि याने, जगद्धराने 'मालतीमाधवा'च्या 'सानन्दं नन्दिहस्ताहत-' या श्लोकात पर्जन्यकालाचे रूपक कल्पून जो अर्थ लावला आहे तो योग्य नाही. 'नैषोऽर्थः कवेः विवक्षागोचरोऽपि तस्मात् नायं ध्वनिमार्गविदां पन्थाः' अशी जी निर्भीड टीका

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

केली आहे, ती डॉ. माईणकरांनी उद्धृत केली असून, दराग्रिवत् रूपकांच्या साच्यांत बसविण्याच्या खटाटोपाने कलाकृतीवर 'अत्याचार' (over-doing) होत नाही ना याची सावधगिरी घेतली पाहिजे असे म्हटले आहे, ते यथार्थ होय. अर्थात पूर्णसरस्वतीसारखा सहृदय बहुश्रुत पंडित दैवी रूपकाच्या साच्यात एक सामाजिक कलाकृती बसवितो याबद्दल त्याची स्थलकालविशिष्ट धार्मिक श्रद्धा लक्षात घेतल्यास, त्याला दोष देणे योग्य होणार नाही.—चौथ्या प्रकरणांत 'उत्तररामचरिता' वरील 'संजीवन' व्याख्येचा कर्ता घनश्याम याच्या गुणदोषांची चिकित्सा डॉ. माईणकरांनी डोळस व न्याय्यरीतीने केली आहे. घनश्याम हा मोठा पंडित असून त्याने स्वतःला 'कोशावलीवल्लभः' म्हटले आहे व त्याप्रमाणे त्याने आपल्या 'व्याख्ये'त अनेक कोशकारांचा, ग्रंथकारांचा, देशी भाषांतील शब्दांचा उल्लेख केला आहे. पण कलाकृतीच्या समीक्षकाला आवश्यक अशी सहृदयता, कलाकृतीच्या अंतरंगात प्रवेश करण्याइतकी रसिक सहानुभूति त्याच्या ठिकाणी दिसून येत नाही. त्यामुळे त्याचे पांडित्य 'जड' व 'शुष्क' ठरते. स्वतःला 'कवीनां कविः' म्हणवून घेणाऱ्या घनश्यामाचे 'कवित्व' त्याच्या अहंकारी दर्पपूर्ण पांडित्याखाली गुदमरून गेले आहे. 'उत्तररामचरिता'सारख्या नाटकावर "रामनवमीच्या एका रात्रीत सर्व 'संजीवन' व्याख्या आपण पूर्ण केली" हा त्याचा एक लेखविक्रम म्हणता येईल पण तो कौतुकास्पद ठरण्याऐवजी, त्यातील रसशून्यतेमुळे तो केवळ दर्पोक्ति ठरतो. भवभूतीचे काही अत्यंत सुंदर श्लोक—उदा० 'अंतःकरणतत्त्वस्य', 'श्रमाम्बुशिशिरीभवत्प्रसृतमन्दमन्दाकिनी–' 'अस्मिन्नेव लतागृहे त्वमभवः–' यातील असामान्य रससौन्दर्याचा आपल्या अनुचित व सहृदयताशून्य 'टिप्पणा'ने त्याने विरस करून टाकला आहे. त्याच्या ठिकाणी कविसुलभ तरल संवेदनाशीलतेचा अभाव ढळढळीतपणे (gross poetic insensibility) आढळून येतो हे डॉ. माईणकरांनी अशा रीतीने साधार दाखविले आहे—आपल्या पुस्तकाच्या पाचव्या प्रकरणात डॉ. माईणकरांनी 'विद्धशालभञ्जिके' वरील 'चमत्कारतरंगिणी' या व्याख्येचा परामर्श घेतला आहे. या 'व्याख्ये'च्या कर्त्या सुंदरी व कमला घनश्यामाच्या पत्नी आहेत. स्वतः घनश्यामाने 'विद्धशालभञ्जिके' वर 'प्राणप्रतिष्ठा' 'व्याख्या' लिहिली आहे तिला पूरक असे स्वरूप 'चमत्कारतरंगिणी' चे आहे. सुंदरी व कमला यांनी आपल्या पतिराजापासूनच संस्कृतरचनेची स्फूर्ति घेतली आहे. आपल्या 'कवीनां कवी:' अशा 'नाथां'विषयीं त्यांना वाटणारा अनुराग व अभिमान त्यांनी 'नाथचरणां' चा जो हवाला वारंवार आपल्या 'व्याख्ये' तून दिला आहे त्यावरून व्यक्त होतो. आपले नाथ 'कवितारचनेत' दंग असतात म्हणून त्यांनी

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'नाथां'ची 'सुकविता' ही 'सपत्नी' मानली असून, 'लज्जा नौ रहसि प्रकाशमपि हा नाथाननेन्दुं सुखं। चुम्बन्ती न विलज्जसे सुकविते धन्या सपत्नी ह्यसि' अशी तिच्याविषयी मधुर काव्यमय असूया प्रगट केली आहे! स्त्रियांनी ही संस्कृत रचना केली आहे हे जसे एक या 'चमत्कारतरंगिणी'चे वैशिष्टय तसेच ह्या स्त्रिया व्युत्पन्न विदुषी आहेत हे तिचे दुसरे वैशिष्टय आहे. त्यांनी राजशेखराच्या रचनेतून कालिदासाच्या काव्यातील कल्पनांचे पडसाद कसे उमटले आहेत हे साधार दाखविले आहे. त्या स्वतः महाराष्ट्रीय असल्यामुळे त्यांनी महाराष्ट्रीय म्हणी व चालीरीती व्यक्त करणारे शंभरावर महाराष्ट्री शब्द मूळ संस्कृतमधील वचने स्पष्ट करण्याकरिता उद्‌धृत केली आहेत, ती महाराष्ट्रीभाषाविकासाच्या दृष्टीने अत्यंत उपयुक्त आहेत. याशिवाय त्यांनी आपल्या व्याख्येच्या ओघात अनेक प्रसिद्ध संस्कृत ग्रंथांचा व त्यांच्या कर्त्यांचा उल्लेख केला आहे. कालिदासाचा तर त्यांनी ३० वेळा उल्लेख केला असेल. कालिदासाच्या त्यांनी केलेल्या उल्लेखांबाबत एक विलक्षण वैशिष्ट्य आढळून येते: कालिदासाच्या नांवावर जे सुप्रसिद्ध ग्रंथ आहेत त्या ग्रंथांतील वचने उद्‌धृत करून त्यापैकी कांही कालिदासाची, इतर काही भर्तृमीढाची व इतर राहिलेली ईश्वरकृष्णाची असे त्यांनी म्हटले आहे. घनश्याम यानेदेखील आपल्या 'संजीवन' व्याख्येमध्ये कालिदासाच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या ग्रंथातील कांही श्लोकचरण उद्‌धृत करून ते ईश्वरकृष्ण व भर्तृमीढ यांचे होत असे म्हटले आहे. म्हणजे घनश्याम व त्याच्या पत्नी सुंदरी व कमला यांच्या मते, कालिदास, ईश्वरकृष्ण व भर्तृमीढ ही एकाच ग्रंथकाराची नावे होत! डॉ. माईणकर यांनी या घनश्यामाच्या आधारावर विसंबून, कालिदास व ईश्वरकृष्ण एकच होत असे जे मत आपल्या 'Kālidāsa: His Art and Thought' या ग्रंथांत मांडले होते, त्याच मताचा पुनरुच्चार प्रस्तुत 'चमत्कारतरंगिणी' प्रकरणी केला आहे. केवळ घनश्यामाच्या वचनांच्या आधारावरून डॉ. माईणकर यांनी हे आपले बनविलेले मत प्रत्ययकारी वाटत नाही. ईश्वरकृष्णाचा जो 'सांख्यकारिका' नांवाचा ग्रंथ उपलब्ध आहे, तो तत्त्वज्ञानदृष्ट्या मोजक्या दार्शनिक परिभाषेत मांडला असल्यामुळे जरी परिणामकारक वाटत असला, तरी तो कालिदासाच्या अर्थपूर्ण प्रासादिक प्रतिभाशाली लेखणीतून उतरला असेल असे मानणे आंतरिक प्रमाणदृष्ट्या बरोबर वाटत नाही. कालिदासाच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या ग्रंथांतील दार्शनिक किंवा तत्त्वज्ञानात्मक भाग वाचताना जो त्याच्या प्रतिभाशाली शैलीचा सुंदर आविष्कार उठून दिसतो, तो अल्पांशानेही 'सांख्य-


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कारिका 'त दिसून येत नाही. म्हणूनच घनश्याम व त्याच्या दोन पत्नी यांच्या वचनांपेक्षा अधिक भक्कम पुराव्याची कालिदास–ईश्वरकृष्णांचे ऐक्य ठरविण्यास आवश्यकता आहे. डॉ. माईणकरांनीही 'याबाबत आणखी उपोद्‌बलक प्रमाणांची आपण वाट पाहिली पाहिजे' असे प्रांजळपणे म्हटले आहे.– निरनिराळ्या नाटकप्रकारांवरील संस्कृत 'व्याख्यां'चे परिचय-परीक्षण करताना डॉ. माईणकर यांनी 'भगवदज्जुकीयम्' या प्रहसनावरील नारायणभट्ट-शिष्य ( १७ वे शतक ) या 'व्याख्या'काराच्या 'दिङ्‌मात्रदर्शिका' या 'व्याख्ये'च्या वैशिष्टयाचे उद्‌बोधक विवेचन केले आहे. 'भगवदज्जुकीयम्' या हास्योत्पादक प्रहसनाचे कथानक साधे व गंमतीचे आहे : शाण्डिल्य नांवाच्या बौद्ध श्रमणकाने एका भगवान् हिंदु परिव्राजकाचे शिष्यत्व पतकरले असून तो आपल्या गुरूकडून एका उद्यानात योगशास्त्र शिकत आहे. गुरुशिष्यांचा संवाद चालू असता, जवळच एक वसंतसेना नावाची सुंदर गणिका आपल्या दोन दासींसह उद्यानात येऊन त्यांच्या जवळच बसते. शाण्डिल्य वसंतसेनेकडे आकृष्ट झाल्यामुळे, त्याचे चालू असलेल्या योगपाठाकडले लक्ष उडते. इतक्यात योगायोग असा घडून येतो की वसंतसेना सर्पदंश होऊन निश्चेष्ट पडते. त्यासरशी शाण्डिल्य धावत तिच्याजवळ जाऊन पहातो तो ती मृत झालेली आढळून येते. शाण्डिल्याचे गुरु परिव्राजक भगवान् यांना आपले यौगिक सामर्थ्य शिष्याला दाखवायला ही संधि योग्य वाटते व ते योगबलाने वसंतसेनेच्या कायेत प्रवेश करतात. लगेच निश्चेष्ट असलेली वसंतसेना शुद्धीवर येऊन जे बोलायला लागते ते परिव्राजकाला साजेल असे वैराग्यपर. वसंतसेनेचे वैराग्यपर बोलणे ऐकून तिच्या दासी व भोवतालचे लोक हिला वेड लागले की काय याबद्दल अचंबा करू लागतात. इकडे वसंतसेनेचे प्राण हरण करून नेणारे यमदूत तिचे प्राण भगवान् परिव्राजकाच्या निश्चेष्ट पडलेल्या शरीरात घालतात. त्याबरोबर तो परिव्राजक शुद्धीवर येऊन जे बोलावयाला लागतो ते गणिकेला साजेसे शृंगारिक भाषण असते. हा सगळा अद्‌भुत प्रकार पाहून, शाण्डिल्य गोंधळून जातो व यांतले आपले गुरु कोण व गणिका ( अज्जुका ) कोण हे ओळखणे त्याला अशक्य होते. हा सर्व उलटापालटा प्रकार– गणिका तत्त्वज्ञान बोलते व परिव्राजक शृंगारचेष्टा करतो– पाहून वाचकांना व प्रेक्षकांना गंमत वाटन त्यांची करमणूक होते. या विनोदी हास्योत्पादक कथानकात जो प्रसंगनिष्ठ व शब्दनिष्ठ विनोद दिसून येतो त्यांत या 'प्रहसनरत्ना' चे यथार्थत्व व यशस्विता अंतर्भूत आहेत. या प्रहसनावर 'दिङ्‌मात्रदर्शनी' च्या कर्त्याने 'व्याख्या' करिताना प्रत्येक


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वाक्याचे दोन भिन्न अर्थ लावले आहेत : एक बाह्यार्थ– हास्योत्पादक वाच्यार्थ व दुसरा आभ्यंतर– अतिगंभीर तत्त्वज्ञानात्मक व्यंग्यार्थ. प्रहसनाचे असे दोन पातळीवरील अर्थ लावण्याची परंपरा या 'व्याख्या' काराला अवगत असावी. कारण हे दोन अर्थ लावताना त्याने खालील श्लोक दिला आहे :

( अत्र इदम् अनुसंधेयम् : )

अस्मिन् नाट्यरसे निसर्गगहने योगीन्द्रशिष्यौ उभौ
आत्मानौ परजीवशब्दकथितौ अन्या तथैवाज्जुका ।
मूलाधारसमुद्गता ससुषिरा नाडी सुषुम्नाऽपरे
चेट्यौ चोभयपार्श्वगे ससुषिरे नाड्याविडापिंगले ॥

– म्हणजे प्रहसनातील पात्ररेखांचा आभ्यंतर गूढार्थ हा की भगवान् गुरु हे परमात्मा व शाण्डिल्य हा जीवात्मा होय. गणिका वसंतसेना सुषुम्ना नाडी व तिच्या दोन दासी इडा व पिंगला या नाडी होत. – अशा तऱ्हेने सबंध प्रहसनभर, 'व्याख्या' काराने बाह्यार्थ व आभ्यंतर अर्थ लावण्याचा खटाटोप केला आहे. अशा दोन अर्थ लावण्याच्या प्रयत्नात 'व्याख्या' काराचे पांडित्य व अभिनव बुद्धिचातुर्य दिसून येते यांत शंका नाही. परंतु प्रहसनाचा आस्वाद घेणाऱ्या प्रेक्षकाच्या किंवा वाचकाच्या मनात प्रत्येक ठिकाणी लावलेला 'आभ्यंतर' अर्थ द्वैधीभाव उत्पन्न करून हास्यरसाची हानि करील की काय अशी भीती वाटते. ही भीती डॉ. माईणकरांनीही " या गूढ गंभीर तत्त्वज्ञानात्मक अर्थाचे ओझे प्रहसन या काव्यकृतीला पेलवेल किंवा सहन होईल का अशी भीती वाटते व ती न्याय्य होय यांत शंका नाही. " अशा शब्दांत व्यक्त केली आहे.

भिन्नभिन्न संस्कृत नाटकप्रकारांतून कांही प्रातिनिधिक नाटके घेऊन त्यावरील प्रसिद्ध संस्कृत 'व्याख्या'कारांच्या 'व्याख्यां'चा डॉ. माईणकरांनी केलेल्या परिचयपरीक्षणाचा सारांश वर दिला आहे. त्यावरून डॉ. माईणकरांच्या या विषयावरील सूक्ष्म व दीर्घ व्यासंगाची, व मार्मिक समीक्षेची कल्पना येईल. भिन्न 'व्याख्यां' चे परिचय-परीक्षण करताना त्यांनी अत्यंत प्रांजळपणे त्यांतील गुणदोषांचेही सुकुमारतेने आविष्करण केले आहे. संस्कृत नाटकांचा अभ्यास करताना या संस्कृत 'व्याख्या'कारांची उपेक्षा करून चालणार नाही, उलट त्यांच्यामुळे संस्कृत नाटकांचे समीक्षण अधिक चिकित्सापूर्ण, सम्यक् व सरस होईल, हे त्यांच्या ग्रंथाचे प्रतिपाद्य सर्वमान्यच होण्यासारखे आहे. संस्कृत


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'व्याख्या' ग्रंथाची उपेक्षा होत आहे अशा या प्रस्तुतकाळी डॉ. साईणकरांनी हा ग्रंथ लिहून आपल्या 'मधुकर' वृत्तीने काही प्रसिद्ध संस्कृत 'व्याख्या' कारांची असाधारण वैशिष्ट्ये प्रकट केली आहेत, त्याबद्दल ते धन्यवादास पात्र आहेत. त्यांनीच आपल्या ग्रंथाच्या शेवटी उद्धृत केलेल्या श्लोकात थोडा बदल करून त्यांच्याबद्दल असे म्हणता येईल की,

तत्त्वं किमपि व्याख्यानां जानाति विरलो भुवि ।
मार्मिकः को मरन्दानामन्तरेण मधुव्रतम् ॥

– प्रा. वि. म. वेडेकर

---


१९४७–१९५४ पर्यंत झालेल्या मराठी पुस्तकांत प्रथम क्रमांकाचे साहित्य अकादमी (नवी दिल्ली) चे रु. पाच हजार पारितोषिक प्राप्त झालेले

वैदिक संस्कृतीचा विकास

(सुधारून वाढविलेली नवीन आवृत्ती)

पृ. ६००] [किंमत ३० रुपये.

लेखक– तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी.

वैदिक संस्कृतीचे विकसित रूप म्हणजेच आजची भारतीय संस्कृती होय. भारतीय संस्कृतीच्या जन्मापासून आतापर्यंत आलेल्या स्वरूपाचे वर्णन या पुस्तकात प्राधान्याने केले आहे.

प्रकाशक : प्राज्ञपाठशाळामंडळ वाई (जि० सातारा)




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## वाचकांचा -पत्रव्यवहार —

### ज्ञानदेवांच्या कालखंडाची साधने : समारोप *

'नवभारत' मासिकाच्या ताज्या (डिसेंबर ७३) अंकातील 'ज्ञानदेवांच्या कालखंडाची साधने' या विषयावर मला आवाहन करणारा प्रा. ह. चं. घोंगे यांचा लेख.

प्रा. घोंगे यानी या अंकात ज्ञानदेवांच्या समाधीला 'थडगे' म्हटले असले ( पृ. ९९ ) तरी त्यानी ज्ञानदेवाविषयी श्रद्धा जोपासून धरली आहे ( पृ. ९८ ) आणि माझ्याविषयी 'तसे' लिहून माझ्या आशीर्वादाची ( पृ. ९८ ) व मार्गदर्शनाची अपेक्षा केली आहे ही दर्शनी सत्ये आहेत असे मानून मी लिहीत आहे.

मी एकाकाळी धरलेला आग्रह : 'भाषाशास्त्राच्या आधारावर टिकणारे; संदर्भाविरहित नसणारे, विसंगतीने न भरलेले पुरावे ( ज्ञानदेवांच्या विषयी ) पुढे यावेत' ( पृ. ९८ ) प्रा. घोंगे यानीही धरला आहे याबद्दल मला समाधान वाटते.

हा शास्त्रीय पातळीवरील संवाद आहे. मूळ विषय 'ज्ञानदेवांच्या कालखंडाची साधने'. या साधनांची ग्राह्याग्राह्यता ठरविण्याबद्दल प्रा. घोंगे यानी कोणते निकष मानले आहेत हा माझा प्रश्न :

"कोणते अभंग, पदे वा पुरावा विश्वसनीय मानावा याबद्दल प्रा. घोंगे यानी कोणते निकष मानले आहेत किंवा कोणते दण्डक शास्त्रीय मानले जातात हे स्पष्ट केले तर या विषयावर लिहिण्यात स्वारस्य आहे" ( 'नवभारत' आक्टोबर ७३, पृ. ८९ )

हे विचारताना प्रा. घोंगे यानी संहिता-चिकित्सेचा ( textual criticism ) अभ्यास करून ज्या अभंगाचे किंवा ज्या विशिष्ट पाठाचे आधारे ते विधाने करतात ते विश्वसनीय आहेत का प्रक्षिप्त आहेत हे निश्चित करून

---

* हा वाद येथे थांबविण्यात येत आहे. — का. सं.

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विश्वसनीय ठरणाऱ्या पाठांचे आधारे ज्ञानदेव-विषयक संशोधन व्हावे ही भूमिका.

हा प्रश्न विचारताना मी विदर्भातील कोणत्याही विद्वानाचा उल्लेख केला नव्हता किंवा मी विदर्भातील नाही हे माहीत असताना :

" विशेषतः विदर्भातील 'कपाशी संस्कृती' ही तर नव्या शोधाकडे बघून झोपून राहण्यात फारच दिग्विजयी आणि बुद्धीने तेवढीच दिवाळखोर ठरली आहे " ( 'नवभारत' डिसेंबर ७३ पृ. ९१ )

असा मूळ प्रश्नाशी असंबद्ध व शास्त्रीय चर्चेत येऊ नये असा वैदर्भी विद्वत्तेचा अधिक्षेप प्रा. घोंगे यानी का केला समजत नाही. शास्त्रीय चर्चेत मतभेद रहाणारच. पण आपण तेवढे शास्त्रीयसंशोधक, बुद्धिवादी व आपल्याशी मतभेद असणारे 'हरदास' ही विकृती अशा चर्चेत येऊ नये. माझा आक्षेप परमतखंडनाबद्दल नाही पण त्या अभिनिवेशात मतभेद दर्शविणारांचा वैयक्तिक अधिक्षेप करण्याबद्दल आहे. आमच्या व आमच्यापूर्वीच्या पिढ्यानी संशोधनाचे नावावर अशास्त्रीय स्वरूपाचे, हीन अभिरुचीचे व वैयक्तिक हेवेदावे साधण्यासाठी लिखाण केले नाही असे नाही. पण :

यान्यस्माकं सुचरितानि तानि सेव्यानि । नो इतराणि । – एवढेच मला नवीन पिढीला आवर्जून सांगावयाचे आहे.

मी मोठा संशोधक किंवा विद्वान् नाही. पण एम्. ए. झाल्यानंतर ज्ञानदेवीचा अभ्यास सुरू केल्यावर मला प्रा. घोंगे यांच्यासमोर जे प्रश्न आहेत तेच आले होते. त्यावेळी आमच्या व आमच्या पूर्वीच्या दोन पिढ्याना textual criticism या शास्त्राची तितकिशी कल्पना नसावी किंवा असल्यास महत्त्व वाटत नसावे म्हणून आपल्यासमोरचा पाठ खरा या अभिनिवेशात वाद होत. या वादाना इष्ट वळण लागावे म्हणून १९४२ मध्ये मी 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'तून संहिता-चिकित्सा (textual criticism) या विषयावर दोन लेख लिहिले. या गोष्टीला ३१ वर्षे होऊन गेली पण मराठीत ज्ञानेश्वरी, नामदेव गाथा इ. संतवाङ्मयाच्या ( महाभारताच्या किंवा रामायणाच्या संशोधित आवृत्त्याप्रमाणे ) पाठचिकित्सा असलेल्या आवृत्त्या ( माझ्या माहितीप्रमाणे ) निघाल्या नाहीत. त्यामुळे माझ्या समोरचेच प्रश्न प्रा. घोंगे यांचे समोर जवळ जवळ त्याच स्वरूपात आहेत.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नवीन पिढीने जुन्या ग्रंथांचे संशोधन केल्यास अशा critical editions काढण्यासाठी उपयुक्त साहित्य सापडू शकेल असे मला ज्याप्रमाणे १ ते ८०४ ओव्या असणारी 'अनुभवामृत' एक प्रकरणच आहे असे दाखवणारी पोथी सापडली यावरून तशा इतर पोथ्या मिळू शकतील असे वाटते. (मी सदर पोथीबद्दल त्याकाळात लिहिले होते). मी याच (नवभारत) मासिकात प्रसिद्ध केलेल्या लेखात ज्ञानेश्वरीच्या 'वाशी' प्रतीत आलेली प्रक्षिप्ते दाखवली तशी प्रक्षिप्ते जुन्या संतवाङमयात अनेक ठिकाणी घुसल्यामुळे सध्याच्या मुद्रित संतवाङमयातील पाठ (व त्यांना गृहीत धरून होणारे वाद) 'ज्ञानेश्वरांच्या कालखंडाची साधने' म्हणून संशयातीत नाहीत. या ठिकाणी मुद्दाम नमूद करतो की संत मल्लाप्पाण्णा वासकर यांच्या हस्ताक्षरातील ज्ञानेश्वरी एकनाथी ज्ञानेश्वरीची प्रत आहे तिच्याबद्दल हा उल्लेख नसून वासकरांच्या वाशी मठातील दुसऱ्या पोथीबद्दल आहे.

ज्याकाळी ज्ञानदेवांचे तत्त्वज्ञान व काश्मीरी शैवमत यांचे संबंध पं. बाळाचार्य खुपेरकर मांडत होते त्याकाळात ज्ञानदेव व बौद्धसांप्रदाय (वज्रयान पंथ) यांचे संबंध मी या (नवभारत) मासिकातून मांडीत होतो व ज्ञानदेवांना जरी आपले पहिले मानवी गुरु मत्स्येंद्रनाथ वाटत असले तरी तिबेटी परंपरे-प्रमाणे सरहपादापासून (शिष्यपरंपरेच्या) काही पिढ्यानंतर मत्स्येंद्रनाथ होऊन गेले असून ते मूळपुरुष ठरत नाहीत असे मी दाखविले होते. त्यामुळे मला उद्देशून ज्ञानदेवांची गुरुपरंपरा व बौद्धसंप्रदाय यांचा संबंध आहे हे जे अभिनिवेशपूर्वक सांगण्यात आले आहे ते जरा अनाठायी आहे. पण ज्ञानदेवांच्या कालखंडाची साधने' या दृष्टीने मत्स्येंद्रनाथ व मीननाथ एक की दोन या चर्चेने काय भर पडणार आहे याचा प्रा. धोंगे यांनी फेरविचार केला तर बरे होईल.

ज्ञानेश्वरीच्या अभ्यासासाठी यादवकालीन मराठीची पार्श्वभूमी समजावी म्हणून मी अपभ्रंशाचा अभ्यास केला हे खरे आहे व त्याची फलश्रुती म्हणून भारतातील आर्यभाषांचा इ. स. ५०० ते १२०० या कालखंडात झालेला स्थल-कालात्मक विकास मी माझ्या प्रबंधात मांडला आहे. पण तो प्रबंध १९४८ मध्ये प्रसिद्ध होण्यापूर्वीच मी ताबड्या फितीत गुंडाळला गेलो तो १९६९ मध्ये सेवानिवृत्त झाल्यावर सुटलो. त्या (Historical Grammar of अपभ्रंश) प्रबंधातील दाक्षिणात्य अपभ्रंश (Southern Apabhrams'a) याच्या दिलेल्या भाषिक विशेषांचा यादवकालीन मराठीच्या अभ्यासास उपयोग होईल. पण मी निवृत्त होताच श्रीमद्भागवत आणि ब्रह्मसूत्रे यावरील वेदान्ताच्या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

निरनिराळ्या सांप्रदायांच्या टीका व भाष्ये यांच्या अभ्यासात गुंतल्यामुळे मला भाषाशास्त्रात लक्ष घालणे सध्या जमणार नाही. प्रा. घोंगे यांच्या मूळ लेखावरून ते माझ्यासारखेच ज्ञानेश्वरांच्या कालखंडाच्या साधनातील विसंगतीमुळे गोंधळल्यासारखे वाटले व त्याना माझ्या अनुभवापासून काही शिकण्यासारखे असल्यास ते घ्यावे म्हणून हे लिहिले आहे.

प्रा. घोंग्यानी ज्ञानेश्वराचा जन्मशक बदलल्याबद्दल त्याना वाटते ( पृ. १०० ) तसा मला रोष वगैरे काही वाटले नाही. तर्कशुद्ध, सप्रमाण पुराव्यानी जे सिद्ध होईल ते मला मान्य. यात रागलोभ नाही. पण विशिष्ट मत मांडताना पुरावे न देता विधान ठोकू नये ( उदा. पतंजलीची योगसूत्रे ' एक अध्यात्मिक काव्य ' पृ. ९८ ) असे लिहिण्याचे भरात त्यानी माझ्याबद्दल जे अनाठायी व निष्कारण शब्द वापरले आहेत त्याच्यावरून त्यांची परीक्षा होते. मला त्याबद्दल राग नाही. पण विवेकी व संयमपूर्वक लिहिणे हितावह असते इतके सुचविण्याची परवानगी घेतो. तसेच त्यानी माझ्या संशोधनाबद्दल व्यक्त केलेल्या आदराबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

ज्ञानदेवांच्या कालखंडाविषयी संशोधन करून मौलिक साहित्य मिळविण्यात प्रा. घोंगे याना यश मिळावे ही इच्छा — वयाच्या वडीलकीमुळे त्यानी अपेक्षिल्याप्रमाणे ' आशीर्वाद '.

— ग. वा. तगारे

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

एकनाथ महाराजांचे ज्ञानेश्वर महाराज यांचे –

समाधी प्रवेश व ज्ञानेश्वरीची मूळ प्रत

संत ज्ञानेश्वर समाधीस्त होताना त्यांच्यासमोर चौरंगावर ज्ञानेश्वरीची एक प्रत ठेवली होती, असा उल्लेख नामदेवांच्या 'श्री ज्ञानेश्वरांची समाधी' ह्या अभंगप्रकरणात असा एक अभंग आहे.

जाऊनी ज्ञानेश्वर बैसले आसनावरी।
पुढे ज्ञानेश्वरी ठेवियेली ॥ ४ ॥

– अभंग क्र. १०९१ महाराष्ट्र शासनप्रत १९७० पृ. ४५१.

पुढे २५०।३०० वर्षांनी स्वप्नात दृष्टांत झाल्यामुळे ज्ञानेश्वरांच्या समाधीत प्रवेश करून एकनाथांनी ज्ञानेश्वरांच्या मानेभोवती अजान वृक्षाची मुळी गुंतली असता ती सोडविली. ह्या प्रसंगीचे त्यांचे अभंग प्रसिद्ध आहेत. पण त्या अभंगात त्यांना ज्ञानेश्वरासमोर ठेवलेली ज्ञानेश्वरीची प्रत दिसली किंवा नाही ह्याचा उल्लेख नाही. ज्ञानेश्वरांच्या मानेभोवती गुंतलेली मुळी सोडविताना किंवा ज्ञानेश्वरांना शेकडो वर्षांनी सदेह पाहतांना त्यांचे भान हरपून फक्त त्यांच्याकडेच दृष्टी खिळली गेली असावी. आजकालच्या चिकित्सक संशोधक अभ्यासकांप्रमाणे त्यांनी ज्ञानेशांच्या समाधीचे निरीक्षण केले नसावे. फक्त ज्ञानेश्वरांनी स्वप्नात जेवढे सांगितले तेवढेच काम करून बाहेर आले असावेत.

नंतर एकनाथांनी ज्ञानेश्वरी संहितेत जे अपपाठ शिरले त्यांचा विचार करून व अनेक महत्त्वाच्या पोथ्यांचे अवलोकन करून आपली शुद्धीकृत संहिता शके १५०६ मध्ये तयार केली. नाथांच्या निधनानंतर केवळ शंभर वर्षांत या बाबतीत अपपाठांची इतकी बजबजपुरी झाली की गोपाळाश्रम स्वामी पंढरपूरकर यांस नाथांचे अनुकरण करून पुन्हा शुद्ध संहितेचा प्रश्न हाती घ्यावा लागला व त्यांनी काशी क्षेत्री राहून हा उद्योग केला. ( शक १६६२ ).

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

महाराष्ट्रात ज्ञानेश्वरी संहितेच्या किमानपक्षी तीन परंपरारूढ प्रती असून त्या अनुक्रमे सिद्धनाथ, एकनाथ व गोपाळाश्रम ह्या होत. ( संदर्भ– 'ज्ञानदेवी' रा. ग. हर्षे पाठसंग्रह– पृ. ८१ )

नाथांची शुद्धी कृत मूळ पोथी सुद्धा उपलब्ध नाही हे केवळ दुर्दैव नाही तर काय ? ज्या प्रती उपलब्ध होतात त्या नाथोत्तर कालीनच.

एकंदर सांगण्याचे तात्पर्य काय तर ज्ञानेश्वरकाली कागदाची निर्मिती फारच कमी प्रमाणात होत असावी. किंवा तो सुलभपणे उपलब्ध होत नसावा. म्हणून ज्ञानेश्वरांच्या समाधीच्या वेळी त्यांच्या समोर सच्चिदानंदबाबा लिखितच मूळ ज्ञानेश्वरीची प्रत ठेवली गेली असावी अशी दाट शंका येते. कारण महाराष्ट्रात कागदावरील जुन्यात जुने मराठी ग्रंथाचे हस्तलिखित शके १४५७ मध्ये नकललेले कविश्वर भास्कराच्या 'उद्धवगीते'चे आहे. ( संदर्भ– उद्धवगीता–संपा. वि. भि. कोलते १९६२ प्रस्तावना पृ. १.२) त्यापूर्वीचीही एक दोन हस्तलिखिते कागदावरील सापडतात पण ते संस्कृत भाषेतील ग्रंथ आहेत.

एकनाथांना समाधीमध्ये प्रवेश करण्याचा सुयोग लाभला होता. त्यावेळी नाथांना कोणी प्रतिकार केल्याचा उल्लेख नाही. वास्तविक ज्ञानेश्वरानी ज्या मार्गानी समाधीत प्रवेश केला होता व नाथांनी ज्या मार्गानी समाधीत प्रवेश करून घेतला, ही दोन्ही निराळी होती हे सांगणे न लगे. त्याच वेळी नाथांनी आपले निश्चित काम पूर्ण केल्यानंतर तेथली ज्ञानेश्वरीची प्रत आपल्या सोबत आणली असती तर कोणी प्रतिकार केला नसता. ज्ञानदेवांनी तर खचितच केला नसता. पुढे नाथांना ज्ञानेश्वरी शुद्धीचा खटाटोप न पडता मूळ शुद्ध ज्ञानेश्वरीच जनतेसमोर ठेवता आला असती. पण असे मात्र घडले नाही हे खरे. ३०० वर्षानंतर ज्ञानेश्वरांना सदेह पाहण्याचे भाग्य अथवा पुण्य फक्त नाथांच्याच पदरी होते असे जरी गृहीत धरले तरी मिळालेल्या उत्तम योगाचा फायदा घेऊन मूळ ज्ञानेश्वरी उपलब्ध करून दिले असते तर फार बरे झाले असते. त्यामुळे पुढील काळात ज्ञानेश्वरी संहितेबाबत जी रणे माजली ती माजली नसती. आणि ह्यामुळे कधीही न संपणारे वादविवाद झाले नसते. असे घडणे हे महाराष्ट्रीयांच्या नशिबीच नव्हते असे निराशेचे उद्‌गार काढण्यावाचून गत्यंतर नाही.

ह्याबाबतीत मी ज्ञानेश्वरीच्या एका अधिकारी अभ्यासू विद्वानाकडे विचारणा केली असता त्यांनी मला आपले मत कळविले की नाथांच्या पारंपरिक चरित्रामध्ये आपण म्हणता त्याप्रमाणे गोष्टी घडल्या हे खरे पण



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हे सारे अद्भूत चमत्कारमय आहे. नाथ समाधिप्रवेश करतात त्यावेळी त्यांना तेथे ज्ञानेश्वरी सापडली नसावी. नाहीतर त्यांनी सोबत आणली असती. वास्तविक योगसामर्थ्याने ज्ञानेश्वरांची सदेह मूर्ति ३०० वर्षानंतरही राहू शकते तर त्याच सामर्थ्याने पोथीही राहिली पाहिजे पण तसे घडले नसावे वगैरे वगैरे; ह्यापलीकडे ते खुलासा करण्यास असमर्थ आहेत असे सांगितले.

ह्या खुलाशाने माझ्या जिज्ञासू मनाचे काही समाधान झाले नाही. ह्याबाबतीत आतापर्यंत काय काय लिखाण झाले आहे. हे पाहण्यासाठी मी श्री. म. प. पेठे संपादित ज्ञानदेव वाङमय सूचि (१९६८) चाळण्यास सुरवात केली. परंतु त्यामध्ये सुद्धा १/२ अपवाद वगळता वरीलसारखे प्रश्न कोणी उपस्थित केल्याचे दिसत नाही त्यापैकी एक असे की " विश्वस्तांच्या संमतीने ज्ञानेश्वरांची समाधी उघडून त्यातील अस्सल प्रत पहावी. म्हणजे संहिता प्राचीनतेचा वाद संपेल हा उपाय भावभंजनात्मक खरा पण योजावा. पाश्चात्य देशात असे संशोधन होत आहे असे प्रतिपादन " ( श्री ज्ञानेश्वरांची समाधी दे. द. वाडेकर 'सह्याद्री' जाने. १९५३. पृ. ५३ ) लेख प्रसिद्ध झाला त्या काळी म्हणजे १९५३ साली समाधी–संशोधनाबाबतीत काय काय घडामोडी घडल्या किंवा कोणाचे काय म्हणणे आहे हे कळण्यास मार्ग नाही. कारण अलीकडे श्री. अ. रा. देशपांडे 'अनिल' ह्यांनी ह्या बाबतीत किर्लोस्कर मासिकांमध्ये लेख लिहिला असता उभ्या महाराष्ट्रातील शिक्षित, अशिक्षित भाविकामध्ये केवढा हल्लकल्लोळ माजला होता हे सार्‍यांना माहित आहेच. आता तर समाधीपरिसरात चिकित्सकपणे निरीक्षण करणार्‍यांस बाहेर घालविले जाईल असा चक्क बोर्ड लावला आहे.

दुसरे असे की– " एकनाथांचा घसा दुखू लागला व थांबेना. पुढे तिसर्‍या दिवशी त्यांना दृष्टांत झाला त्यांनी प्रत शुद्ध केली व आळंदी समाधीचा जीर्णोद्धार केला याचा पारमार्थिक खुलासा. ज्ञानेश्वररूपी वाङमयमूर्तीस अज्ञान-रूपी अजानवृक्षाच्या पाठांतररूपी मुळीचा बसलेला गळफास संशोधनरूपी दिव्य शस्त्राने छेदून श्री ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध करावी व तेणेकरून महाराजास आराम द्यावा " ( अजान वृक्षाची मुळी व ज्ञानेश्वरीची शुद्ध प्रत.–मे. रा. टाकी 'ज्ञानेश्वर' मार्च १९५१ पृ. १७–२२ ).

आता श्री. मे. रा. टाकी यांच्या पारमार्थिक खुलाशाप्रमाणे अर्थ घ्यायचा म्हणजेच एकनाथ महाराजांचे जे समाधीप्रवेशाचे अभंग आहेत ते प्रक्षिप्त आहेत असे समजावे काय ?



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आता काही सुशिक्षित भाविक, विद्वान लोक असे म्हणतील की, हा नसता खटाटोप कशाला? उपलब्ध आहे ती ज्ञानेश्वरी अभ्यासावी, मनन करावी म्हणजे ज्ञानेशांची कृपा होईल. ते सारे ठीक आहे. पण संशोधनक्षेत्रात पारंपरिक माहिती आणि केवळ भाविकता व अंधश्रद्धेला काडीमात्र स्थान नाही; हेही तेवढेच सत्य आहे. तरी विद्वान व संशोधक अभ्यास अथवा ह्या विषयांचे जाणकार ह्या बाबतीत समाधानकारक खुलासा करू शकतील काय? म्हणजे अभ्यासक त्यांचे फार ऋणी होतील. व काही शंका खालीलप्रमाणे आहेत:

१. मुळांतून नामदेव महाराजांचे अभंग प्रक्षिप्त आहेत काय? कारण काही संशोधक त्यांना ज्ञानेश्वरोत्तर कालीन ठरवू पाहतात.
२. एकनाथ महाराजांचे समाधिप्रवेशाचे अभंग प्रक्षिप्त आहेत काय?
३. नाथांनी खरोखरच समाधिप्रवेश केला होता काय?
४. जर प्रवेश केला असेल तर त्यांनी तेथली ज्ञानेश्वरी प्रत सोबत का आणू शकले नाहीत?
५. कां नाथांचा स्वप्न-दृष्टांताचा अर्थ पारमार्थिक घ्यावयाचा?

वगैरे वगैरे.

– आनंद ना. कुंभार

WITH COMPLIMENTS
FROM
Sharada Dairy Farm
Visit for All delicious
Bengali Sweets
Thakurdwar Road,
BOMBAY – 400002



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# प्राज्ञपाठशालामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| १. धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी | ८०.०० |
| | कापडी बांधणी | १०४.०० |
| २. धर्मकोश - उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी | १५०.०० |
| | कापडी बांधणी | १८२.०० |
| ३. धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला | | ४५.०० |
| | कापडी बांधणी | ५३.०० |
| ४. मीमांसाकोश भाग १ ते ७ ( संपूर्ण ) | | २५०.०० |
| ५. कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश | | ६.०० |
| ६. बौद्धागमार्थसंग्रहः | | २०.०० |
| ७. वैदिक संस्कृतीचा विकास (सुधारून वाढविलेली आवृत्ती) | ( तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ) | ३०.०० |
| ८. नवमानवतावाद | | २.५० |
| ९. मानवाचा आदर्श | | ३.०० |
| १०. चार्वाक – इतिहास आणि तत्त्वज्ञान | ( प्रा. सदाशिव आठवले ) | ३.०० |
| ११. गीता-प्रवेश | (डॉ. गो. वि. देवस्थळी ) | २.५० |
| १२. महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना | (श्री. चा. अ. दाभोलकर ) | २.०० |
| १३. सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृती | (श्री. प्र. रा. देशमुख ) | ४.०० |
| १४. इतिहासाचे तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) | | ७.०० |
| १५. लोकशाहीचे धोके (श्री. पन्नालाल सुराणा) | | २.०० |
| १६. भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श ( सौ. कमल पाध्ये ) | | ३.०० |

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# दर्जेदार किर्लोस्कर एंजिनांना भारतीय मानक संस्थेचे प्रमाण पत्र

५ ते ८ हॉर्स पॉवर




प्रथम पासूनच किर्लोस्कर एंजिने त्यांच्या उत्तम दर्जाबद्दल प्रसिद्ध आहेत. देशातील आणि परदेशातील असंख्य शेतकरी व इतर ग्राहक यांच्याकडे वापरात असलेली एंजिने हे याचे प्रतीक आहे.

आतां भारतीय मानक संस्थेने (ISI) देखील प्रमाणपत्र देऊन, हे मान्य केले आहे.




किर्लोस्कर एंजिन– शेतकऱ्याची पहिली पसंती

**किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लि.**

१३, लक्ष्मणराव किर्लोस्कर रोड, खडकी, पुणे ३

® एंजिनसाठी किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लिमिटेड यांनी या ट्रेडमार्कच्या उपयोगाचा अधिकार दिलेला आहे.

7315-M




Regd. No. M-H 132

नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका